


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका







# दीपावली

साहित्य • कला • संगम

वासंतिक कथा--विशेषांक ※ जून १९६४   मूल्य १। रु.



## श्रेयनामावलि —




टे. नं. ७७७६५

Gram : DALALART

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

※ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु.+ रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. ※ प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57




अनुक्रमणिका

# कथाविशेषांक पहावा काढून !





**–दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाच झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


**मराठी** लघुकथा महाराष्ट्रांतल्या वाचकांपर्यंत नेऊन पोहोचविण्यांत आणि हा वाङ्मयप्रकार मराठींत रूढ करण्यांत बराच मोठा वाटा मासिकांचा आहे हें आतां कुणी नाकारीत नाहीं. ही परंपरा मराठी मासिकें अजून चालवीत आहेत. लघुकथा व क्वचित् कादंबरी हें तर आतां मासिकांचें वैशिष्ट्य ठरून गेल्यासारखें झालें आहे. पृष्ठांची विपुलता व दोन प्रकाशनांतल्या महिन्याच्या अंतरामुळें वाचकांना मिळणारा निवांतपणा यामुळें कदाचित हें अधिक शक्य झालें असावें. कांहींहि असलें तरी मासिकांकडे येणाऱ्या कथांची संख्या दिवसेंदिवस वाढते आहे. अनेक नवीन कथालेखक हा वाङ्मयप्रकार हाताळून आपल्या प्रतिभेची उंची अजमावीत आहेत.

अन् हें सगळें खरें असूनहि कथाविशेषांक काढण्याचें काम लग्न करून पहाण्याइतकें किंवा घर बांधण्याइतकें कठीण आहे असें आमचें प्रामाणिक मत आहे. पसंती-नापसंतीचा मुद्दा विवाहाइतकाच कथांच्याहि बाबतींत महत्त्वाचा असतो. पायपीटहि तितकीच. बहुतेक लेखक आपल्या दर्जेदार कथा दिवाळी अंकासाठीं राखून ठेवण्याचा प्रयत्न करतात (प्रातिनिधिक कथासंग्रहांतल्या कथांची निवड दिवाळी अंकांतून होते हें तरी अजून बऱ्याच जणांना माहीत नाहीं!) विवाहाच्या बाबतींत मासांमधला मार्गशीर्ष तसा कथांच्या दृष्टीनें कार्तिक महिना पर्वणीचा. हें झालें विवाह अन् कथाअंकांतलें साम्य. रचनाकौशल्य तर घरबांधणीइतकेंच पणाला लागतें. या सगळ्या विवेचनाला आत्मप्रौढीचा वास कुणाला येईल; पण स्पष्ट सांगतों, बांबूची कामटी वाकवून शिवधनुष्य सज्ज करावयाचा आव आम्हांला मुळींच आणायचा नाहीं.

साहित्यक्षेत्रांतले हल्लीचे (मतलबी) वारे कसे आहेत? मराठींतले आघाडीचे कथाकार श्री. अरविंद गोखले यांचेच शब्द पहा "..... मासिकांची व कथाकारांची संख्या न मोजतां येण्यासारखी झालेली आहे. ह्या विपुलतेचे इतर कांहीं चांगले परिणाम असले तरी एक दुष्परिणाम असा कीं, कुणी कोठें लिहावें ह्याला धरबंद राहिला नाहीं. पूर्वी एकेका मासिकाची कथाकारांची टीम असे, लेखकांच्या मासिकाबद्दल निष्ठा असत. संपादक-लेखकाचें एक नातें निर्माण झालेलें असें हें नातें, ही निष्ठा निष्ठा आतां सैल झाली आहे....." (मराठी कथा १९६३). संबंधित लोकांच्या अगदीं मनांतली गोष्ट श्री. गोखले बोललेले आहेत.

पण ही परिस्थिति सुधारणेंहि कांहीं अंशीं आपल्या हातीं आहे. संपादक-लेखकांचे हे संबंध अधिक स्नेहशील करण्यासाठींहि कांहीं पावलें टाकतां येतील. पण मुख्य अडचण लेखकांच्या कलासामर्थ्याची आहे. सांकेतिकतेचें प्रमाण वाढतें आहे अशी एक तक्रार वारंवार ऐकूं येते. आणि याचें कारण उघड आहे. बऱ्याच लेखकांजवळ उत्कट संवेदनाक्षम आणि इतरांपेक्षां वेगळें असें व्यक्तिमत्त्व नाहीं. बहुतेकांची अनुभव घेण्याची आणि ते व्यक्त करण्याची पद्धत ही एकसारखी असते त्यामुळें दोन वेगळ्या कथाकारांच्या कथांचा तोंडवळा पुष्कळदां सारखाच आढळतो.

दुसरी अडचण लेखनपूर्व व लेखनगर्भ आत्मनिष्ठेची. हा विषय जरा नाजूक असल्यानें (कारण त्यांत लेखकाच्या प्रामाणिकपणाविषयींच शंका उपस्थित होते) यावर जास्त बोलणें धाष्टर्याचें ठरेल. तरी एक गोष्ट मात्र नक्की. आपणास आलेल्या अनुभवांशीं इमान राखल्याखेरीज लेखकाच्या हातून जिवंत साहित्यकृतीची निर्मिति होणें अशक्य आहे. नुसती एखादी कल्पना फुलवून (व फुगवून) बरेच लेखक हल्लीं कथा शेवटास नेऊं पहातात पण त्यांतला पोकळपणा लगेच प्रत्ययास आल्याशिवाय रहात नाहीं.

व्यावहारिक पातळीवरून बोलतांबोलतां आपण बऱ्याच तात्त्विक चर्चेंत गुरफटलों तेव्हां आतां इथेंच थांबूं या. साहित्यचर्चेपेक्षा अखेरीस साहित्य अधिक महत्त्वाचें. तें वाचकांसमोर आहेच; वर सांगितलेल्या मर्यादा अगोदर ओळखून व शक्य तिथें त्यावर मात करून 'दीपावली'चा हा वासंतिक कथाविशेषांक वाचकांपुढें सादर केला आहे. वाचकांच्या पसंतीस तो उतरेल असा दृढ विश्वास वाटतो.

**–संपादक.**




## भाव्यांचें प्रवासवर्णन : एक प्रश्नोपनिषद्

संपादक "दीपावली"

साष्टांग नमस्कार.

'दीपावली' मे ६४ अंकांतलें श्री. पु. भा. भावे यांचें प्रवासवर्णन वाचलें – अक्षरशः भारावून गेलों ! प्रौढत्वांतहि आपल्या शैशवाची जपणूक श्रेष्ठ साहित्यिक कशी करतात याचें पुनः एकदां प्रत्यंतर आलें. नवीन नवीन अनुभव घ्यायची भाव्यांची ओढ अजून कायम आहे आणि त्याचबरोबर जिज्ञासु वृत्तिहि. त्यामुळेंच त्यांच्या सगळ्याच लिखाणाला एक प्रकारचा ताजेपणा, टवटवीतपणा प्राप्त झालेला आहे. मला आश्चर्य वाटतें तें हें कीं एकीकडे एखाद्या लहान स्वच्छंदी बालकासारखी स्वैर भाववृत्ति त्यांची असते आणि त्याचबरोबर मानवजातीच्या एकूण प्रगतिविषयीं सखोल चिंतनहि चालूंच असतें. या दोन विरोधी प्रवृत्ति त्यांच्या ठायीं एकत्र नांदतात कशा कोण जाणे ! कदाचित् नवनवीन प्रश्न उपस्थित करून त्यांची 'उत्तरें' शोधीत राहण्याचा प्रयत्न दोघांचें मूळ कारण असावें.

भाव्यांच्यापुढील प्रश्न कोणतेहि असोत (कारण कोणतें तें त्यांच्या लिखाणावरून समजेलच) आमच्यापुढें प्रश्न उभा आहे तो एकच स्टॉलवरून चुटकीसरशीं संपणारा 'दीपावली'चा जूनचा अंक मिळवायचा कसा ?

प्रवासवर्णनाच्या पुढच्या टप्प्याकडे डोळे लावून आहोंत. आ.

**–गुलाब कांकरिया** (घोटी).

## 'कांहींतरी विशेष' !

स. न. वि. वि.

आपला एप्रिल महिन्याचा 'दीपावली' अंक वाचला. त्यांत आजगांवकरांनीं युगप्रवर्तक साहित्यिक कै. हरिभाऊ आपटे यांजविषयींच्या ज्या आठवणी लिहिल्या आहेत त्या त्यांच्या जीवनाचें खरेंखुरें दर्शन घडवितात एवढ्या परिणामकारक वाटतात. त्यांच्या जीवनाचें हें जवळून घेतलेलें दर्शन आजगांवकरांनीं आपल्या कुशल लेखणीनें उत्तम तऱ्हेनें रेखाटलेलें आहे. श्री. न. र. फाटकांचाहि त्यांच्या कादंबरीविषयक कामगिरीसंबंधीं माहितीपूर्ण लेख वाचून कै. हरि नारायण आपट्यांविषयीं 'विशेष' असें वाचावयास मिळाल्याचें समाधान वाटलें.

वाचकांवरचा लोभ असाच वृद्धिंगत व्हावा.

आपला एक रसिक वाचक,

**–मनोहर नाईक,** (मुंबई)

## 'दीपावली' = दर्जेदार साहित्य + उत्कृष्ट सजावट

स. न. वि. वि.

'दीपावली' या लोकप्रिय मासिकाचा नव महाराष्ट्र पुरवणी विशेषांक वाचला. 'दीपावली' मासिक उत्कृष्ट सजावटीबद्दल तसेंच दर्जेदार साहित्य वाचकांना पुरविण्याबद्दल अग्रेसर आहे याची साक्ष या अंकावरून दिसून येते.

या अंकांतील श्री. अनंत तडवळकर यांची 'मुलाखत' ही विनोदी कथा चांगलीच वठलेली आहे. तसेंच 'रांग' ही श्री. पद्माकर गोवईकर यांची कथा वाचनीय आहे. सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. वसंत शांताराम देसाई यांनीं कै. गो. ब. देवल यांचा लिहिलेला परिचय अभ्यासपूर्ण व उद्बोधक असाच आहे.

'दीपावली' मासिक दिवसेंदिवस प्रगतिपथावर जाऊन वाचकांना दर्जेदार अन् वाचनीय साहित्य पुरवो हीच सदिच्छा !

आ.

**–रामचंद्र वि. पुजारे** (दादर)

## एक स्तुत्य उपक्रम :

संपादक 'दीपावली'

स. न. वि. वि.

आपण सुरू केलेल्या कोड्यांतील विधानें पाहिल्याबरोबरच 'दीपावली बुद्धिबळ' हें नांव सार्थ वाटतें. खरोखर आपलीं विधानें बुद्धीला चालना देणारीं असतात व ज्याला मराठीचें चांगलें ज्ञान आहे, व सामान्य माहिती आहे अशालाच त्याचें उत्तर सापडतें. आपला हा उपक्रम इतर 'जुगारी' शब्दस्पर्धा पाहिल्या की फारच स्तुत्य वाटतो व त्यामुळें आपल्याला स्वतःच्या मातृभाषेबद्दलची कितपत माहिती व ज्ञान आहे हें अजमावतां येतें.

आपला हा उपक्रम असाच चालू राहील व लोकांकडून त्याचें प्रचंड स्वागत होईल याची खात्री आहे. आ.

**–वि. भ. अभ्यंकर,** (सोलापूर)

**पांच साहित्यिकांच्या उत्तर दिग्विजयाचा पहिला टप्पा दिल्ली हा होता. तेथून प्रयाण करण्यापूर्वीच्या प्रवासाचा श्री. पु. भा. भावे यांच्या तेजस्वी लेखणींतून उतरलेला भावस्पर्शी वृत्तान्त आपण 'दीपावली'च्या मे ६४ अंकांत वाचलात. या प्रवासवर्णनाचा दुसरा हप्ता चालू अंकांत प्रसिद्ध होणार होता; परंतु मे महिन्यांत नगर येथें भरलेल्या मराठी नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाची जबाबदारी श्री. पु. भा. भावे ह्यांच्या शिरावर पडल्यानें तो भाग आतां जुलै ६४ अंकांत प्रसिद्ध होईल.**






**तुम्हीं मुंबई पाहिली आहे ? थोडीशी बघितली असेल. पण कोंकणांतल्या मोरूनें अजून ती पाहिली नाहीं. मोरूचे मामा आतां त्याला ती दाखवायला निघालेत. त्याच्या खेडवळ शंकांना उत्तरें देत, आपल्या बोलण्यांतनं नवीन शंका त्याच्या मनांत निर्माण करीत आणि पसंत नसलेल्या गोष्टींवर परखडपणें टीका करीत. ज्यांनीं मुंबई पाहिली आहे त्यांच्या नजरेंतून बऱ्याच गोष्टी निसटल्या आहेत हें त्यांना पटवून देणारी आणि ज्यांनीं ती पाहिली नाहीं त्यांच्या मनांतली उत्सुकता जागी करणारी जयवंत दळवींची ही लेखमाला "दीपावली" च्या या अंकापासून सुरू होत आहे. कधीं गुदगुल्या करणारी, कधीं चिमटे काढणारी, तर कधीं मिस्किलपणें पाठीवर थाप मारणारी त्यांची विनोदी शैली याहिवेळीं त्यांच्या सोबतीला आहे येवढें सांगितलें म्हणजे पुरे.**

**शाबास मोरू !**

अखेर मोठ्या जिद्दीनें तूं ही मुंबई पहाण्यासाठीं आलास ! याबद्दल मी तुझें अभिनंदन करतों. तुझ्या गांवीं तुझी शेती-माती अडून राहिलेली असणार. तुला तांतडीनें परत जायचें असेल ! म्हणून (आणि आमच्याहि एका खोलींत पाहुण्यांची सोय होणें कठीण म्हणून–) आपण आपली मुंबई झटपट पाहून घेऊं !

मोरू ! वास्तविक तूं मुंबई पहाण्यासाठीं मुद्दाम आलास याबद्दल तुझें कौतुक केलें पाहिजे. कारण तसें म्हणशील तर हें युग कांहीं मुंबई पहाण्याचें नाहीं. उलट दर घटकेला मुंबईहून आपले हजारों बंधु आणि भगिनी विमानानें (किंवा तेवढा खर्च परवडला नाहीं तर बोटीनें) इंग्लंड, अमेरिका रशिया, जपान वगैरे ठिकाणीं जात असतात. थोडक्यांत, चालू युग हें आपलें शहर किंवा आपला देश पहाण्याचें नसून परदेश पहाण्याचें आहे.

मोरू ! आपले शास्त्रज्ञ (म्हणजे इंटर सायन्स फेल झालेले किंवा बी. एस्सी– एम्. एस्सी. पास झालेले तरुण), आपले इंजिनियर (त्यांच्या मतें या ब्लडी इंडियांत आपल्याला स्कोपच नाहीं !) यांना परदेशांत जाऊन आल्याशिवाय गंगेंत न्हाल्यासारखें वाटत नाहीं.

मामा ! आपले मिणिस्टर नाही।कां जात परदेशांत ?

होय मोरू ! त्यांनाहि परदेशांत जावेंच लागतें. त्यांनीं परदेशांत जाऊन करारांवर सह्या केल्या नाहींत तर आपला अन्न-धान्याचा किंवा संरक्षणाचा प्रश्न सुटत नाही. म्हणून त्यांना बिचाऱ्यांना इच्छा असूनहि परदेशांत जावेंच लागतें. शिवाय, आपले मंत्री परदेशांत गेले म्हणजे तिकडे आपली गुडविलसुद्धां वाढते.

पण मामा ! गुडविल म्हणजे हो काय ?

मोरू ! तसें म्हणशील तर गुडविल वाढते म्हणजे काय होतें तें मला सुद्धां नीटसें समजलेलें नाहीं.

पण गुडविल वाढते एवढें निश्चित ना ?

होय मोरू ! गुडविल निश्चित वाढते. आपल्या देशाचें कांहींच कुठें वाढत नसतांना निदान् गुडविल वाढते हें काय कमी झालें ? म्हणून आपल्या मंत्र्यांनीं वारंवार परदेशच्या वाऱ्या केल्याच पाहिजेत !

मोरू ! तूं यांची गोष्ट सोडच ! पण आपले समाजसेवक सुद्धां परदेशांत गेले नाहींत तर या देशांतली समाजसेवा अडून रहाते हें तुला माहीत आहे काय ? इंग्लंड, अमेरिका, रशिया या देशांत जाऊन एखाद्या सेमिनारमध्यें भाग घेतल्याशिवाय या आपल्या देशांत समाजसेवा कशी करावी याचा उलगडा होत नाहीं.

मामा ! येथें एक प्रश्न विचारूं का ?

अवश्य विचार ! मोरू, जेथें जेथें तुझ्या मनांत प्रश्न येईल तेथें तेथें तूं तो अवश्य विचार. मी उत्तरें देईन. अर्थात उत्तरें देऊन प्रश्न सुटतो असें नाहीं हें तू आपल्या देशांत काय चाललें आहे त्यावरून समजूं शकशीलच ! आपल्याकडे प्रत्येक प्रश्नाला उत्तर आहे. तरीसुद्धां आपल्याकडे एकहि प्रश्न सुटत नाहीं. तेव्हां सुटण्यासाठीं नसला तरी उत्तरासाठीं तूं जरूर प्रश्न विचार !

मामा ! माझा पहिला प्रश्न असा– आपल्या या देशांत तसे समाजसेवक किती आहेत ?



अनुक्रमणिका

मोरू ! तुला वाटतो तेवढा हा वर्ग लहान नाहीं. किंबहुना हाच वर्ग सर्वांत मोठा असावा. माझ्या हिशोबाप्रमाणें हिंदुस्तानांतील——

मामा, आपल्या देशाचें नांव हिंदुस्तानच का ?

योग्य प्रश्न विचारलास मोरू ! आपण आपल्या देशाला भारत अथवा इंडिया म्हणूं. उगाच आपल्या एखाद्या शब्दानें जातीय वैमनस्य उद्‌भवायला नको. जातीय ऐक्य टिकवा असें आपले नेते नित्य सांगत असतात तें आपण ध्यानीं ठेवायला हवे.

तर–मामा, तुम्ही काय म्हणत होतां —?

हो ! माझ्या हिशोबाप्रमाणें भारतांतील अज्ञान बालकें सोडलीं तर आपली उरलेली लोकसंख्या ही समाजसेवकांचीच आहे असा माझा अंदाज आहे. आपले मंत्री हे तर बोलून चालून समाजसेवकच. पण आपले शिक्षक सेवक, पोलिस सेवक, कारकून सेवक, व्यापारी सेवक–येथें सेवक नाही कोण ? मोरू तूं सुद्धां सज्ञान झाल्यावर समाजसेवक होशील !

पण मामा, मुंबईत माणूस सज्ञान कधीं होतो ?

योग्य प्रश्न विचारलास. पण या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण आहे. कारण प्रत्यक्षांत सज्ञान म्हणजे काय हें ठरवणें मुष्कील आहे. तथापि खात्री करून घेण्यासाठीं आपण 'सज्ञान' या शब्दाचा अर्थ काय तें शब्दकोशांत पाहूं ! अर्थातच, शब्दकोशांतल्या अर्थावर फार विसंबतां येणार नाहीं. कारण शब्दकोश हे नेहमींच जुने असतात. आणि अर्थ आपल्या फॅशनप्रमाणें नव्यानव्यानें बदलत असतात. तथापि शब्दकोश चाळून बघायला कांहींच हरकत नाहीं. (नाहीं तर कोशाचा तरी उपयोग कधीं आणि कसा करायचा ?) तर हा पहा शब्दकोश– सज्ञान म्हणजे (१) शहाणा, हुषार, बुद्धिवान, विद्वान्, जाणता. म्हणजे हा पहिलाच अर्थ साफ खोटा आहे हें तुझ्या लक्ष्यांत आलेंच असेल. आपल्या चाळीस कोटींच्या (याहि आंकड्यांत प्रत्येक क्षणाला बदल होतोच आहे !) देशांत किमान पंचवीस कोटि लोक तरी सज्ञान आहेत. त्या सर्वांना शहाणे, हुषार, बुद्धिवान म्हटलें तर तें योग्य दिसेल काय ? या अर्थानें हे लोक 'सज्ञान' असते तर आपल्या देशाची ही अशी स्थिति झाली असती काय ? आतां शब्दकोशांतला हा दुसरा अर्थ पहा–(२) (कायदा) वयांत आलेला, जाणता, समजूं लागलेला. अज्ञानाचे उलट. हा अर्थ सुद्धां ढोबळ मानानेंच घेतला पाहिजे. कारण, कायद्यानें वयांत आलेला किंवा समजूं लागलेला माणूस सज्ञान होतो हें सत्य आहे. पण तें संपूर्ण सत्य नव्हे. कारण वयांत न आलेल्या आमच्या पोरांना सुद्धां आजकाल अधिक समजूं लागलें आहे. वयांत आल्याशिवाय (म्हणजे 'सज्ञान' झाल्याशिवाय) माणसाला मतदानाचा हक्क मिळत नाहीं. पण वयांत आलेलीं माणसें चुकीचीं मतें देतात आणि वयांत न आलेल्यांना खूप मतें फुटतात ही विसंगति आपण पहातोंच. वयांत आल्याशिवाय कायद्यानें लग्न करतां येत नाहीं. तथापि वयांत न आलेली पोरें वयांत येईपर्यंत (म्हणजे लग्न होईपर्यंत) पोरींना घेऊन राजरोस (बेकायदा) फिरतात हेंहि आपण पहातों. फक्त पोरेंच पोरींना घेऊन फिरतात असें म्हणून मी पोरांवर अन्याय करूं इच्छित नाहीं. कारण येथें पोरीहि पोरांना घेऊन फिरत असतात. आपण मुंबई पहाण्यासाठीं बाहेर पडूं तेव्हां या साऱ्या गोष्टी तुझ्या लक्ष्यांत येतीलच !

मामा ! तुम्ही मला सज्ञान होतांच समाजसेवक हो असा सल्ला देत होतां !

बरोबर ! मोरू, मधून मधून तूं माझी गाडी रुळावर आणत जा. कारण रुळाबाहेर जाणें, रस्ता चुकणें वगैरे वृत्तींचा माझ्या मनावर अलिकडे पगडा पडलेला आहे. कारण आपल्या मोटरी पहा– रस्त्याबाहेर जातात, गाड्या रुळाबाहेर पडतात, विमानें आपले तळ चुकतात. या रोजच्या बातम्या वाचून नकळत मनावर परिणाम होतो. आणि बोलतां बोलतां आपलीहि गाडी रुळाबाहेर जाते.

-तर, समाजसेवक हो असा तुम्ही सल्ला देत होतां, मामा !

होय, मोरू ! समाजसेवक हो ! कारण हा एकच धंदा असा आहे कीं कांहीं एक केल्याशिवाय खूपसें कांहीं केल्याचा दावा करतां येतो. आपण काय करतां ? असा प्रश्न विचारतांच बेकार माणसांना ओशाळावें लागतें. पण समाजसेवक होतांच काय करतां या प्रश्नावर ओशाळावें लागत नाहीं. (कारण खरे बेकारच समाजसेवक असतात, आणि समाजसेवकच खरे बेकार असतात !) काय करतां असें विचारतांच समाजसेवा किंवा सांस्कृतिक कार्य असें उत्तर देतां येतें.

पण समाजसेवा किंवा सांस्कृतिक कार्य म्हणजे काय ?

मोरू ! या प्रश्नाचें उत्तर माहीत असण्याचें कांहींच कारण नाहीं. कांहीं उत्तरें अशीं असतात कीं त्यावर आणखी प्रश्न निर्माण होत नाहींत. सांस्कृतिक कार्य करतों असें उत्तर दिलें कीं म्हणजे काय करतां असा आणखी प्रश्न कोणी विचारत नाहीं. सांस्कृतिक कार्य म्हटलें म्हणजे येथेंच सर्व कांहीं संपलें हें जाणून ऐकणारा गप्प बसतो.

म्हणजे मामा, हें जरा चमत्कारिकच आहे!

आहे खरें ! पण त्याला इलाज नाहीं. जोंपर्यंत लोकांना पुरेसा रोजगार मिळत नाहीं तोंपर्यंत सांस्कृतिक कार्य चालूंच रहाणार. समाजसेवकांचा सुळसुळाट चालूंच रहाणार. समाजसेवक होण्यानें फायदेहि बरेच होतात अनेकांना रहाण्यासाठीं सरकारकडून घरें मिळतात. टेलिफोन मिळतात. वेगवेगळ्या समित्यांवर नेमणुका होतात. भत्ते सुरू होतात आणि परदेशाच्या वाऱ्या करतां येतात. मोरू, हे फायदे काय कमी झाले ?

पण मामा, अशा परदेशाच्या वाऱ्या केल्यानें आपल्या देशाचें आर्थिक नुकसान नाही का होत ? आपल्या देशाला फारेन एक्स्चेंज नाहीं का गमवावें लागत ?

वा ! मोरू ! म्हणजे हें फॉरेन एक्सचेंजचें प्रकरण तुझ्यापर्यंतहि पोंचलेलें दिसतें. अरे, फारेन एक्सचेंज हा शब्द अर्थमंत्र्याच्या तोंडीं बरा दिसतो. आपल्या तोंडीं नाहीं शोभत. पण तूं म्हणतोस तसाहि विचार केला तरी तुझें म्हणणें मला पटत नाहीं. आपल्या लोकांनीं परदेशाच्या वाऱ्या केल्या कीं फारेन एक्सचेंज खर्च होतें हें खरें ! पण म्हणून तें फुकट जात नाहीं. कारण परदेशाच्या वाऱ्यांमुळें स्थानिक उद्योगधंद्यांची भरभराट होते. एकाच्या परदेशवारीवर अनेकांचीं पोटें अवलंबून असतात. परदेशवारीमुळें विमानकंपन्या चालतात. त्यांतल्या नोकरवर्गाला चांगले पगार मिळतात. विमानांत

जें जेवण देतात तें पुरविणाऱ्या हॉटेलांचा धंदा चालतो. परदेशीं जाणाऱ्या माणसांना पार्ट्या मिळतात किंवा द्याव्या लागतात म्हणजे पुन: हॉटेलचीच भरभराट. धोतर पंचेवाल्यांनासुद्धां सूट शिवून घ्यावे लागतात. त्यामुळें शिंप्यांच्या धंद्याला बरकत येते. एवढेंच काय, विमानांत बसण्याआधीं प्रत्येक वारकऱ्याच्या गळ्यांत पाटीभर हारतुरे पडतात. लोकांचे परदेशीं जाणें कमी झालें तर आपल्या माळ्यांचा धंदा खाडकन् खालीं बसेल. आपल्या फुलवाल्यांचा धंदा कांहीं देवाच्या भक्तीवर किंवा बायकांच्या आंबाड्यावर चाललेला नाहीं. आम्ही लोक देव पूजतों. पण कुठल्याहि देवाला आण्या-दीडआण्यापेक्षां अधिक किंमतीचा हार कधीं मिळत नाहीं. पण परदेशीं जाणाऱ्याच्या गळ्यांत मात्र दहा दहा रुपयांचे हार पडतात. मोरू ! हें आपल्या देवांचें दुर्दैव आहे असें कोणाला बरें वाटणार नाहीं ? पण वाटून तरी काय उपयोग ? त्याचा दोष आपल्या लोकांवर नसून आपल्या देवा-वरच आहे ! आपण जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं वास्तव्य करून आहे असा देवानेंच दावा केल्यामुळें परदेशीं जातों असें देव तरी कुठल्या तोंडानें म्हणणार ? त्यामुळें विचाऱ्याच्या नशिबीं आणेवाला हार ! (त्यांतहि फुलांपेक्षां पानें पाकळ्याच अधिक! )

हें झालें देवाचें ! आतां आपल्या बायकांच्या आंबाड्याचें म्हणशील तर त्यावर अवलंबून रहाणारा जुना भोळा माळी (गंगावनवाल्यासारखाच) उपाशी मरेल ! अलिकडे आमच्या बायकांनीं आपल्या केसाचें काय केलें आहे तें तुला मुंबईत फिरतांना दिसेलच ! आमच्यासारख्यांना तें पहावत सुद्धां नाहीं. मोरू ! कधीं कधीं इतिहास सूड उगवतो म्हणतात तो हा असा. माळी समाजाचे पुढारी ज्योतिबा फुले यांनीं स्त्री-शिक्षणासाठीं आपलें आयुष्य वेचलें. पण स्त्रियांनीं शिक्षण संपादन करतांच ज्योति-बांच्या वंशजांचा चक्क केसानें गळा कापला.

आतां केसांचा आंबाडा हा प्रकार मुंबईंत दुर्मिळ होतो आहे. त्यामुळें कांहीं पुराणवस्तु अभिमानी लोक वेगवेगळ्या आंबाड्यांच्या फोटोंचें प्रदर्शन जहांगिर आर्ट गॅलरींत भरवीत असतात. तो उपक्रम स्तुत्यच म्हटला पाहिजे. या उपक्रमाला आपल्या माळी समाजानें (निदान फूल ना फुलाची पाकळी या न्यायानें तरी) सक्रिय पाठिंबा दिला पाहिजे.

म्हणून म्हणतों, निदान परदेशीं वाऱ्यांमुळें तरी फुलांचा धंदा तेजींत चालला आहे. गळ्यांत हार घातले कीं फोटो काढून घ्यावेसे वाटतात. त्यामुळें फोटोग्राफरचें पोट भरतें. ते फोटो वर्तमानपत्रांत छापून येतात. त्यामुळें संपादकांचा जागा कशी भरून काढावी हा प्रश्न सुटतो. म्हणजे एक माणूस 'सांस्कृतिक कार्या'च्या निमित्तानें परदेशीं जाण्यास निघाला कीं त्यावर किती लोकांचे धंदे चाल-तात, याचा मोरू, तूं शान्तपणें विचार कर. परदेशगमनामुळें हे सर्व स्थानिक धंदे भर-भराटीला येतात. त्यासाठीं थोडें फारेन एक्सचेंज खर्ची पडलें तर कुठें बिघडलें ? नाहीं तरी फारेन एक्सचेंजचा उपयोग औद्योगिक विकासासाठीं करावयाचा असतोच ना ?

> **एका बैलोबाचा प्रश्न—**
>
> **कां ओढूं नांगर । जाऊं द्या हो शेती**
> **कुणा आतां भीती । घालीतां ही**
> **पेटी☆ वरी स्थान । तोंवर चढे झिंग**
> **वाकुडें बा शिंग । कोण करी ?**
>
> **—'आंदटी'**
>
> ☆ निवडणुकीची

पण मामा, परदेशीं जाऊन हे लोक काय करतात ?

हे कुठल्या तरी सांस्कृतिक सेमिनारमध्यें भाग घेतात.

सेमिनारमध्यें बायकी थाटाचे पुरुषच भाग घेतात का ?

नाहीं मोरू ! सेमिनार या शब्दांतल्या 'नार' या शब्दामुळें तुझा तसा समज झालेला आहे. पण सेमिनार हा इंग्रजी शब्द आहे. असो ! नको तेथें फार बोललों.

मामा ! तुम्ही मिनिष्टर होण्याचीं लक्षणें दिसतात !

सांगतां येत नाहीं. होईन सुद्धां. पण झालों तर तुला धंदा काढून देईन. असो. तें जाऊं दे ! सांगण्याचा मुद्दा एवढाच, कीं हें चालू युग परदेश पहाण्याचें आहे. आपला देश पहाण्याचें नाहीं. असें असूनहि मोरू, तूं मुंबई पहाण्यासाठीं आलास याबद्दल तुझें अभिनंदन करतों.

मोरू ! ही आमची मुंबई खरोखर पहाण्यासारखी आहे. आजच नव्हे ! पूर्वी-पासूनच. कैलासवासी गोविंद नारायण माडगांवकर यांनीं १८६३ सालीं 'मुंबईचें वर्णन' लिहिलें. त्यांत ते म्हणतात—

"भरतखंडांत मोठमोठालीं नामांकित शहरें पुष्कळ आहेत. परंतु मुंबई शहरासारखें लहान असून टुमदार व अनेक चमत्कारिक विषयांनीं भरलेलें, कोठें आढळत नाहीं असें बहुतेक सांगतात. आणि ही गोष्ट वास्तविक आहे कीं, ह्या शहरासारखें भरगच्च व नोकदार शहर कोठें विरळा. ह्याचा थाट व ऐश्वर्य पाहूनच कित्येक आपला स्वदेश सोडून एथचे वतनदार झाले आहेत; आणि मुंबईंत लोकांची इतकी दाटी होण्याचें बहुतकरून हेंच एक कारण असावें. काय हो सांगावें ! सहज रस्त्यांतून जावें तर टोलेजंग वाडे, विस्तीर्ण इमारती, रमणीय बंगले व बागबगिचे पाहूनच मन चकित होऊन जातें. हें तर असो; परंतु मुंबईंतील रस्त्या-सारखे विस्तीर्ण, स्वच्छ, निर्मळ व सरळ रस्ते हिंदुस्तानांत दुसऱ्या कोणत्याहि ठिकाणीं दिसत नाहींत, असें पुष्कळ लोकांचें म्हणणें आहे. अहो, हे रस्ते शिपायच्या नव्या नव्या युक्त्या तरी आजपर्यन्त किती निघाल्या ! फक्त या रस्त्यावर पाणी शिंपण्याबद्दल सरकारास प्रतिवर्षी पंचवीस तीस हजार रुपये खर्च होतो. कोणी असें म्हणतात कीं, पुण्यांतील फरसबंदी रस्ते मुंबईंतील साध्या रस्त्याच्या जकातीस देखील पुरणार नाहींत. दुसरें आणखी वैभव तें किती वर्णावें ?"

ऐकलेंस मोरू ? मुंबईच्या साध्या रस्त्याचें हें गुणवर्णन ! मग मुंबईचें दुसरें आणखी वैभव तें किती वर्णावें ? पण आणखी वैभव तुला ऐकायचेंच असेल तर ऐक—

अनुक्रमणिका

"पोशाकाच्या डामडौलावरून मुंबईंत तर श्रीमंत कोण, आणि गरीब कोण हें ओळखण्याची मारामार पडत्ये. मुंबईंतील साधारण लोकांस वस्त्रप्रावरणाची जितकी छानछोकी असते तितकी कलकत्त्यांतील मोठमोठ्या बाबूलोकांतहि नसत्ये. काय हो सांगावें ! सहज एकादा ताकवाला दुकानांतून वाहेर पडला, तर वीत दीड वीत कांठाचें अष्टी धोतर नेसतो; लफ्तेदार दशांचें चक्री पागोटें डोकीस घालितो, बुट्टीदार काश्मिरी शाल पांघरतो, हिंगळासारखा लाल नरम आशापाई जोडा पायांत चढवतो; आणि कानांत सुंदर भिकबाळी लटकावून रस्त्यांतून इतक्या मिजासीनें चालत जातो कीं, पाहाणारास हा कोणी जगत्‌शेटीचा नातूच असावा असा भास होतो."

मोरू ! शंभर वर्षांपूर्वीचें वर्णन आहे. त्यामानानें आज मुंबई खूपच पुढें गेली आहे. पण दुर्दैव असें कीं त्यावेळीं साधा ताकवाला जो पोशाक करायचा तो आजच्या आय. ए. एस्‌च्या सुद्धां नशिबीं नाहीं. जाऊं दे! ज्याचें त्याचें नशीब ! पण मुंबईचें वैभव या ना त्या कारणानें वाढत गेलें हें खरें ! म्हणूनच मुंबईची लोकसंख्या वाढत गेली.

मामा, मुंबईची लोकसंख्या किती असेल?

मोरू ! मुंबईची सध्यांची लोकसंख्या पंचेचाळीस लक्ष आहे आणि ती १९८० पर्यन्त ऐंशी लक्ष होईल असें आंकडेशास्त्रज्ञांचें मत आहे. तथापि मुंबईची आजचीच लोकसंख्या ऐंशी लक्षांपेक्षां अधिक आहे असें येथल्या रहिवाश्यांचें म्हणणें आहे. माझें मत विचारशील, तर लोकसंख्येचा आंकडा देण्यापेक्षां ती असंख्य आहे असें आपण म्हणावें. म्हणजे दर वर्षी आंकडा वाढायला नको; तो ऐकून छाती धडकायला नको.

मुंबईची लोकसंख्या वाढो, वेकारी वाढो, जागेची टंचाई वाढो तरीहि ही आमची मुंबई पहाण्यासारखी आहे यांत शंका नाहीं. म्हणूनच या मुंबईला लोकांनीं वेगवेगळीं नांवें दिलीं आहेत. कोणी तिला आशियाचें नाक म्हणतो. हें नांव कां पडलें कोण जाणे ! पण मुंबईंतील प्रत्येक पानाच्या गादीवर मुबलक प्रमाणावर तपकीर मिळते हें खरें ! पूर्वी मुंबईला सोन्याची खाण असें सुद्धां म्हणत असत. आतां असें म्हणणें कठीण आहे. कारण पूर्वी जागोजाग दिसणाऱ्या सोन्याचांदीच्या पेढ्या सुवर्णबंदीनंतर बंद झाल्या. त्या जागीं आतां औषधें, विजेचें सामान विकण्याचीं दुकानें सुरू झालीं आहेत. पण तरीहि मुंबई सोन्याची खाण आहे हें खोटें नाहीं. कारण पूर्वी उघडपणें मिळणारें सोनें आतां भूमिगत झालें एवढेंच. ज्याला तें हवें असेल त्याला तें मिळूं शकतें. कांहीं जण या मुंबईला भारताचें हृदय म्हणतात. त्यामुळेंच कीं काय 'जीवाची मुंबई' करण्यासाठीं अनेक लोक येथें येतात. (पुढें त्यांचा जीव जातो कीं येतो असा होतो ही गोष्ट वेगळी ! ) भारताचे नेते मुंबईला 'नर्व सेंटर' म्हणतात. पण आम्हां स्थानिक लोकांना मात्र तो 'नर्व्हस सेंटर' वाटतो. असो. कोणी कांहींहि नांवें देवोत. लोकांना मुंबईचें आकर्षण जबरदस्त असतें. इकडून तिकडून लोक सारखे येत असतात. कोठें रहायला जागा नाहीं असें म्हणत सुद्धां लोक सारखे येतच असतात.

मोरू ! तरी आतां पूर्वीचे दिवस राहिले नाहींत. आतां तुला मुंबईला येण्यासाठीं बोटीला दहाबारा रुपये खर्च करावे लागले. पण वीस पंचवीस वर्षांपूर्वी कोंकणी लोकांचें नशीब तेजींत होतें. त्या वेळीं कोंकण लायनीवर दोन तीन आगबोट कंपन्या होत्या. त्यांची कांपिटिशन सुरू झाली कीं मुंबईला येण्याजाण्याचे दर सारखे कमी होत. दर कमी होतां होतां एक काळ असा आला कीं एक कंपनी फुकट उतारू आणूं लागली, तर दुसरी कंपनी फुकट प्रवासाबरोबर दोन वेळचें जेवणहि फुकट देऊं लागली. त्यावेळीं फुकट जेवण मिळतें म्हणून किती तरी कोंकणी लोक मुंबईंत आले आणि फुकटांत परत जाण्याऐवजीं येथेंच अडकून पडले. अडकणें हा मुंबईचा एक मुख्य गुणधर्म आहे. तूं थोडे दिवस राहिलास तर तूं सुद्धां अडकून पडशील.

अडकणें, अडकून रहाणें, अडकून पडणें हा मुंबईचा मुख्य गुण. चार दिवसासाठीं आलेला माणूस येथें अडकून रहातो. "कधीं जाणार ?" असें विचारतांच (कारण तो कधीं एकदांचा जातो असें यजमानाला झालेलें असतें ! ) "जाणार होतों कालच. पण जरा अडकून पडलोंय." असें तो उत्तर देतो. तो कसा अडकतो कोण जाणे ! पण अडकतो हें खरें !

कोण नोकरींत अडकतो, कोण धंद्यांत अडकतो. कोण प्रेमांत अडकतो, कोण शब्दांत अडकतो. कोण घेण्यांत अडकतो, तर कोण देण्यांत अडकतो. रस्त्यावर चालतांना सुद्धां कोणाचा पाय कोणाच्या पायांत अडकतो. कोणाचा पदर कोणाच्या छत्रींत अडकतो. कोणाचा खिसा कोणाच्या कात्रींत अडकतो. घरीं म्हणशील, तर प्रत्येकालाच अडकून रहावें लागतें. नळावर दुसरीं माणसें आहेत म्हणून इतर माणसें अडकून रहातात. संडासांत दुसरा कोणी गेला आहे म्हणून इतर बाहेर अडकून पडतात. घरांत मुलगा आणि सून झोंपलीं आहेत म्हणून सासू-सासरा गॅलरींत अडकून पडतात.

याशिवाय, कोणासाठीं कोणाचा जीव अडकतो. कोणाच्या हातांत कोणाचे हात अडकतात. नळावर शब्दाला शब्द अडकतो. पाण्याच्या टाकींत पाणी अडकतें. टाकीला पिंपळाचा किंवा वडाचा रोप अडकतो. रोप वाढला तर त्यालाच टाकी अडकते. कपडे वाळवण्याच्या दांडीला रेडिओची एरियल अडकते. हातांत पिशवी अडकते. महागाईंत हात अडकतात. रेडिओंत कान अडकतात. बस, ट्राम, गाडी यांतून सुद्धां लोक अडकून अडकूनच प्रवास करतात. थोडक्यांत म्हणजे म्हणजे प्रत्येक क्षणीं माणूस कशांत ना कशांत अडकलेला असतो. अगदींच एखाद्या क्षणीं माणूस कशांत अडकलेला नसला तर किमान तो त्या क्षणाला तरी अडकलेला असतोच. अगदीं वाईट भाषेंत सांगायचें म्हणजे, शेवटीं तिरडीला अडकला जाईपर्यंत मुंबईंत माणूस कुठें ना कुठें अडकलेला असतो. तिरडीचे बंद सुटतात तेव्हां तो खऱ्या अर्थानें सुटलेला असतो. त्याला खरी शांति किंवा सद्‌गति त्यावेळीं मिळते.

मोरू ! अशी ही आयुष्यभर अडकवून टाकणारी मुंबई आहे !

मामा, आपलें नमन खूप लांबलें. आतां प्रवासाला निघायचें ना ?

(पान ६४ वर)







*'साहित्य समारोहाचा असा सोहळा झाला नाहीं आणि कदाचित् पुढें होणारहि नाहीं' असे उद्‌गार अनेक साहित्यभीष्मांना मडगांवकरांनीं काढायला लावले....*

# धन्य धन्य मडगांवकर !

--गोपाळकृष्ण भोबे

**महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें** पंचेचाळिसावें अधिवेशन मडगांव गोव्यांत भरणार हें ऐकून बहुसंख्य मराठी माणसांचे चेहरे प्रफुल्लित झाले. या बहुसंख्यांतील कांहींचे या साहित्यसमारोहाच्या निमित्तानें अनेक तऱ्हेचे मनोरथ पूर्ण होणार होते. असले समारोह म्हटले म्हणजे अनेक सवलतींचा फायदा घेतां येतो. अर्ध्या तिकिटांत प्रवास होतो. नाममात्र वर्गणी दिल्यानें तीन चार दिवस राहाण्या–जेवण्याची सोय होते. शिवाय प्रेक्षणीय स्थळेंहि पाहातां येतात. तीर्थक्षेत्र असल्यास परमार्थहि साधतो. गोव्यांत भरणाऱ्या साहित्य संमेलनाच्या कार्यकारी मंडळानें या सर्व सोयी जाहीर करून टाकल्या; आणि मग काय विचारतां, हजारों लोकांच्या साहित्यप्रेमाला एकदम उधाण आलें. ऐंशी वर्षांच्या म्हाताऱ्यांपासून पांच वर्षांच्या मुलांपर्यंत प्रतिनिधिपत्रकें मिळविण्यासाठीं अहमहमिका लागली.

झालें. प्रतिनिधींच्या संख्येचे आंकडे हजारांनीं फुगत चालले. कुणीतरी म्हणालें, निव्वळ पुण्याहूनच तीन ते साडेतीन हजार प्रतिनिधींनीं नावें नोंदविलीं. पुण्याहून साडेतीन हजार– मग मुंबईहून किती ? असा प्रश्न गर्दीला भिणाऱ्या लोकांकडून केला जाऊं लागला आणि बऱ्याचशा सुखवस्तूंनीं मनांतल्या मनांत आपला गोव्याला जायचा बेत रद्द केला. मडगांवकरांची कल्पना अशी, कीं फार फार तर साडेतीन ते चार अधिकांत अधिक पांच हजार प्रतिनिधि येतील. त्याप्रमाणें त्यांनीं जय्यत तयारी ठेवली होती. महाराष्ट्रांत मात्र बऱ्याच लोकांत काळजीची कुजबूज व्यक्त केली जात होती. 'एवढेंसें मडगांव; तिथं इतक्या लोकांची राहाण्याची, जेवणाची, आंघोळीची सोय होणार का ? संडासाची काय सोय आहे ?' इत्यादि प्रश्न असंख्यांना भेडसावीत होते. जो तो दुसऱ्याला भय घालीत होता. आपण जायचा बेत रद्द केला आहे असें सांगत होता.

प्रतिनिधींची संख्या मर्यादा ओलांडून जेव्हां सहा हजारांच्याहि वर गेली तेव्हां मात्र खुद्द कार्यकारी मंडळाला काळजी वाटूं लागली. सर्वत्र गोव्यांत– 'हें आतां कसं आवरणार ?' अशी भीति व्यक्त केली जाऊं लागली. सरचिटणिसांना तर अनेक तऱ्हेच्या पत्रांनीं भंडावून सोडलें. कुणी आपल्या वंशावळीची सविस्तर माहिती देऊन तेवढ्या मंडळींची चोख व्यवस्था करावी अशी आज्ञा करीत तर कुणी स्वच्छपणें– 'आम्हांला फक्त गोवा कसा आहे हेंच पाहायचें आहे. संमेलनाशीं आम्हांला फारसें कर्तव्य नाहीं !' असें लिहीत. एकानें तर आपण वयातीत असून (आणि थोडासा अधु असून) आपल्या एका लहान नातवाला घेऊन येत असल्यानें गोमंतकाचें समग्र दर्शन घेण्याकरितां एक स्वयंसेवक आपल्या बरोबर द्यावा आणि हें सर्व पर्यटनाच्या सवलतींत व प्रतिनिधि म्हणून दिलेल्या आठ रुपयांत व्हावें; शिवाय आपल्या जेवण्याखाण्याची आबाळ न व्हावी असें लांबलचक यादीचें पत्र पाठविलें होतें. असलीं हीं पत्रें वाचून सरचिटणीस सुकेरकर विचारे भंडावून गेले होते.

संमेलनासंबंधीं कार्यकारी मंडळानें जे जे अंदाज केले होते ते ते सर्व वेळ येतांच बेफामपणें चुकूं लागले. खर्चाचें अंदाजपत्रक पंचेचाळीस ते पन्नास हजार रुपयांपर्यंत संमत झालें होतें. एवढ्या पैशांत अपूर्व कामगिरी करूं असें कार्यकारी मंडळाला वाटलें; पण प्रत्यक्षांत घडलें तें निराळेंच. निव्वळ मंडपउभारणी साठींच पंचात्तर हजार रुपये खर्च आला; पण मडगांवकर घाबरले नाहीत. त्यांनीं कंबर कसली. काय होईल तें होईल, हें संमेलन यशस्वी करायचेंच असा मनाशीं हिय्या केला. मडगांवांतील प्रत्येक माणूस या कार्यांत अंतर्भूत झाला. आजवरीची मडगांवाची शान त्याला राखायची होती. सकाळीं सहा वाजल्यापासून मध्यरात्र उलटून जाईपर्यंत जो तो काम, काम आणि काम करीत राहिला.

बाहेरून येणाऱ्या प्रतिनिधींची ८, ९ व १० अशा तीन दिवसांच्या व्यवस्थेसाठींच केवळ वर्गणी घेण्यांत आली होती; पण पांच तारखेपासूनच शेंकड्यांनीं प्रतिनिधि येऊं लागले. मंडपाचें काम पुरें झालें नव्हतें. राहाण्या–जेवण्याच्या सोयी पुऱ्या झालेल्या नव्हत्या. परंतु अशा परिस्थितींत देखील मडगांवकरांनीं धीर सोडला नाहीं. हे पांच तारखेलाच हजर झालेले लोक साहित्य

(पान ६४ वर)










*स्वादिष्ट, उत्तम चहाची*
*तलफ भागविण्यासाठीं*

# टाटा-फिन्ले
## चहा

*अप्रतिम चहा आहे!*

टाटा-फिन्ले चहा आपल्याला नेहमीं ताजा, स्वादिष्ट सुवासयुक्त, आणि हवा तसाच कडक मिळतो. याला कारणेंहि तशींच आहेत.

### ताजा चहा
टाटा-फिन्ले चहा खास पॅकबंद पुड्यांतून व डब्यांतून मिळत असल्यानें तो नेहमींच ताजा असतो.

### स्वादिष्ट चहा
टाटा-फिन्ले चहांत अगदीं निवडक अशीच पत्ती वापरली असल्यानें आपल्याला नेहमीं स्वादिष्ट सुवासयुक्त चहा मिळतो.

### उत्तम चहा
टाटा-फिन्ले चहा काळजीपूर्वक मिश्रित केलेला असतो. त्यामुळें आपल्याला नेहमीं कडक व उत्तम चहा मिळतो.

**टाटा-फिन्ले** *चहा प्या,*
*चहाचा खरा आस्वाद घ्या!*











—रा. रं. बोराडे

**माय** भाजी आळींतल्या समद्या रोजगारनीचं म्होरकपन करती. गुतं घेतलेलं आसलं तर सोता रोजगार दिऊन घिऊन जाती. गुतं घेतलेलं नसलं तर शेतवाल्याला सांगून सोबतीला घिऊन जाती. गांवांतल्या समद्या शेतवाल्याला हें ठावं आसतं. म्हणून शेतांत काई कामधंदा निगाला म्हंजी तो सरळ मायकडं येतो. गुतं द्यायचं आसलं तर घटका दोन घटका घोळींत घालींत वसतो. गुतं द्यायचं नसलं तर शेतांत कामाला या म्हणून सांगतो. माय मंग किती बाया फायजी म्हणून इचारती. शेतवाला बाबा मंग सोताच्या मनाला हिशेब घालतो. धा लागायच्या असल्यातर धा आनायला सांगतो. पांच लागायच्या असल्यातर पांच आनायला सांगतो. माय मंग हितं जा तिथं जा करती. जितक्या बाया लागायच्या तितक्या बाया सांगून यिती. जिला माय सांगत सांगती ती मायवर खूस व्हती. जिला माय सांगत न्हाई ती मायवर नाराज व्हती. मायवर ती नाराज व्हती; पर तेवढाच अेक दिवस.- दुसऱ्या दिशीं ती पुना मायच्या वाटंकडं डोकं लावून वसली. मायचा सोभाव तिला ठाव असतो. ह्या वारीला माय जिला सांगत न्हाई तिला दुसऱ्या वारीला हटकून सांगती. मायच्या असल्या सोभावामुळं मायच्या पुटच्यांतल्या बाया कंत्राच फुटत न्हाईत.

कंवा बंवा शेतवाला बाबा आदल्या-दिशींच मायला सांगून ठिवतो. माय बी मंग जरासासुदा दिरंग लावींत न्हाई. तींबी त्याच घटकंला आळींत फिरून यिती. जिला जिला सांगायचं तिला तिला सांगून ठिवती. मायचं अेक धोरण मातर लई कडक. जिला माय यायला सांगती तिनं कामाला यायलाच फायजी. जर तिला यायला जमतं नसलं तर घटका दोन घटका अदुगर सांगायला फायजी. तसं जर तिनं केलं न्हाई तर माय तिला लगेच आपल्या पुटच्यातून पडं करती. पुना म्हनून माय जल्दी तिला आपल्या पुटच्यांत घेत न्हाई. मायच्या असल्या धोरनामुळं साऱ्या बाया मायला दवकून वागत्यात. कामाला यायला जमत नसलं तर घटका दोन घटका अदुगर यायला सांगून ठिवत्यात.

एकदां किसना माळयाची मोडनी करायची व्हती. आदल्या दिशींच मायला त्यानं तसं सागितल व्हतं. मायनंबी सांच्याक पारींच सगळयाजनीला सांगितलं व्हतं. किसनानं बजावल्या परमानं तिनं बी एरवाळी निगायला बजावलं व्हतं. आन् तींबी त्याच इराद्यानंच कामाला लागली व्हती. गांवांतलीं गुरं आतांशी कुठं आकरावर गेलीं व्हतीं; पर एवढयांत मायचे राखा भांडे झाले व्हते. पोतरा भुईसारवन झालं व्हतं. कोरडयास तयार हून चुलीम्होर रटरटत व्हतं आन् ती आतां रोटया वडवायला वसली व्हती. तिची घाई तिच्या रोटया `वडविण्यांतून सुदा दिसत व्हती.



अनुक्रमणिका

*गुजाबायनं जरा येळ माझ्याकडं रागानं बगितलं आन् मंग ती मोठ्यानं मला म्हनाली,*

*"तूं व्हय ? चल हूं घराच्या भाईर. सोताजवळ हिंमत नव्हती तर कस्याला आनलंस मला हितवर ? असा कां अध्यावर खेळ टाकलास ?" म्या खेळ निम्माच खेळला व्हता. खेळ आरध्यावर आल्यावर मोडला व्हता खरा, पर तेवढ्यासाठी एवढं रागावलेलं म्या कंदी कुनाला बगितलं न्हवतं....*

---

तव्यावरली रोटी भाजली ना भाजली एवढ्यांत दुसरी रोटी तव्यावर टाकीत व्हती. म्या आपला जेवायला बसलों व्हतों. तामनांत रोटी घिऊन जेवत व्हतो. साळंची येळ आतां व्हत आलो व्हती; पर रामा खराडचाच्या चलन्यावनीच माजं जेवन चाललं व्हतं.

माय अस्या रोट्या वडवित व्हती. म्या असं रोटी खात व्हतों. एवढ्यामंदी माळ्याची गुजाबाय आली आन् हिरमुसल्यावनी बसून न्हायली. मायनं इचारलं.

"का ग वया,आवरलंका एवढ्यांत तुजं?"

बळं बळं बगावं तसं गुजाबायनं मायकडं बंगितलं आन् उतरलेल्या आवाजांत सांगितलं "सोनाक्का रोजगारीन वगा एकांदी माज्या वारची"

मायनं इचारलं–

"का ग वया तुला काय झालं?"

"मला जमत न्हाई आज यायला"

"ते समजलं ग, पर का जमत न्हाओ?"

"गोड न्हाई आज जिवाला. कसं की रिकामं रिकामंच वाटायलंया."

तव्यावर रोटी टाकतां टाकतां मायनं गुजाबायकडं बगितलं आन् डोळं मोठं करीत इचारलं–

"आता ग वयो ! दादल्याची याद आली म्हनावं का ?"

माय आसं बोलली तंवा उसासा टाकीत गुजाबाय म्हणाली, "आली याद तर कुनाला सांगावं सोनाक्का !"

मायचं तोंड एकाएकी हिरमुसलं. गुजाकडं बगितल्या बगितल्या वनी करून तिनं तव्यावरल्या रोटीवर पानी लावलं. एकवार गुजाबायकडं बगितलं आन् सवागती इचारावं तसं इचारलं-

"का ग, लागतो का काई तपास ?"

"कसला तपास लागतो माती कंपाळाचा. कुनी म्हनतं त्या बुवासंगच हिकडं कुठं गंगथडीला गेले; तर कुनी म्हनतं त्या बुवाला वी आतां सोडलंया आन् दुसऱ्याच कुन्या बुवासंग–हिकडं कुठं कासी रामेसरला गेलेत. आतां कुठं म्हणून तपास करावा ?"

"रामबावाला इचारायचं व्हतंस. पंचांग बगून तो नक्की ठिकाना सांगतो म्हनं"

"त्या मुड्द्यालावी इचारलं की."

"मंग काय म्हनाला ?"

"दुपारच्या पारीं ये म्हनला घरीं कुनी नसतांना."

कारवटीतली रोटी मायनं सपकन् तव्यावर टाकली आन् एकांद्याला सराप द्यावा तशी ती म्हणाली, "हात तुजी झडपन झाली म्हनावं. पाटी पोटीं कुनी हायीत का न्हाईत म्हनावं त्या मुड्द्याला !"

गुजा म्हनाली-

"जावं द्या. सोनाक्का. आपुन इचारायला गेलं नसतं तर तो कस्याला तसं म्हनला असतां ?"

"आग पर इचारायला गेलं म्हनून कसंबी बोलावं का ?"

गुजा काई बोलली न्हाई, पर माय मातर हातानं रोट्या कराया लागली आन् तोंडानं काई बाई म्हनाया लागली रामबावाला सराप द्याया लागली. गुजानं जग येळ बसल्यावनी केलं आन् मंग उठना उठनां ती म्हनाली.

"मंग येतें म्या सोनाक्का"

मायनं इचारलं–

"रोटी कोरड्यास झालं का ?"

"कसली रोटी आन् कसलं कोरड्यास सोनाक्का. सकाळा झोपतंन उठलें तर आंग सारं जड पडलेलं. उठावं वाटंना का ह्या अंगावरचं त्या अंगावर व्हावं वाटंना."

"रातरी जागली आसचील."

"झोप आली न्हाई तंवा जागलेच म्हणायचं.

"तुला तरी काय म्हनावं माय गुजे. तुजे वय हें आसलं. त्यांतनं वरीस झालं, गडीमानसाचा ढका न्हाओ का वारा न्हाई. तूं तरी आतां हे कंवर सोसावं?"

"तरी वी म्या मोप मन मारते सोनाक्का. कंवा कंवा रातर रातर भुतावनी घरांत काम करीत वसते. वाटतं दोडाचं अस्यानं तरी मन कावत न्हाईल. मनाला जरा इसर पडंल. एकांद्या वकती तसं व्हतं वी; पर एकांद्या वारीला सारं अंग जळाया लागतं. आग आग व्हाया लागती अंगाची. मंग येळकाळ ठिवते बाजूला. तस्या टायमाला वदावदा अंगावर पानी वतून घेते.आतां तुमीच सांगा. कंवर म्या आसं मनाला मारावं ? कंवर म्या आसं जिवा आगूज दुकन् सोसावं ?"

आसं म्हनून गुजा ढसा ढसा रडाया लागली. डोळयांतनं खळा खळा पानी काढाया लागली. गुजाबाय बोलत व्हती तंवा माय एकवार माह्याकडं तर एकवार गुजाकडं बगत व्हती. गुजा रडाया लागली तंवा तिनं हातांतला उंडा खालीं टाकला. पान्यात हात बुचकाळले आन् घाईनं गुजाकडं जातां जातां मला म्हनाली.

"आटप की ये बेन्या तुजं जा. आतां जल्दी साळंत."

मला आसं म्हनून ती गुजाबायजवळ गेली. सोताच्या पदरानं तिचे डोळे पुसतां पुसतां घोगरलेल्या आवाजांत म्हनाली.

"नकु ग माजे वय. वाट चुकलेलं पाखरूं हाय. आज ना उद्यां यील वापस.

"आतां कसलं वापस येतेत सोनाक्का








माजं मेलीचं तकदीरच तसलं!"

"आग मोग हाय तेवढा मोगला फायजी. आपुन मोप म्हनतो माजं आसं व्हावं आन् माजं तसं व्हावं, पर वरच्या बाबाच्या मनांत तसं नसल्यावर आपुन मानसानी तरी काय कराव!"

माय मंग लई येळ गुजाला आसं काई बर्‍या सांगाया लागली. तंवर माजं जेवन झालं. म्या हातांत पाटी घेतली पुस्तक घेतलं आनं सदऱ्याच्या माईनं नाक पुशीत म्हनालो, "माय म्या चाललों बग साळंत."

माझ्याकडं तोंड फिरवून माय म्हणाली—

"जा. आन् दुपारच्या रोटीला यिऊं नकु बग रानांत. गुजाकडं ठिवते तुजी रोटी. दुपारा साळा सुटल्यावर जा तिच्या घरला."

असा राग आला मला मायचा. मला रानांत जायची लई हाऊस—रोटी खायला तरी माय रानांत रोटी खायला बोलविल वाटतं, पर माय मला कंवाच रोटी खायला रानांत बोलावित न्हाई. जंवा वगावं तंवा असी कोन तरी रानांत ना जाणारी बया मायला भेटती आन् तिच्याकडं माय माजी दुपारची रोटी ठिवती. आतांबी माय गुजाकडं रोटी ठिवनार म्हनल्यावर लई हिरमुसलों. पर करावं काय! मुकाट्या म्या साळंला गेलों.

दुपारा साळा सुटली तंवा ऊन जोरकस तापलं व्हतं. ऊन तापलं व्हतं तर फुफाटाबी तापला व्हता. रस्त्यानं चलाया काई नीट येत न्हवतं. चटाचट खालून चटके बसत व्हते. गुजावायचं घरबी तसं काय लांब न्हवतं; पर माज्या पायांत काईच न्हवतं. फुफुट्यांत तर पाय ठिवावा वाटत न्हवता मंग म्या भिंतीची कड धरली आन् सावलीसावलीनं चालत गुजावायच्या घरला आलो. माईरनच म्या चार—पांच हांका मारल्या; पर हां न्हाई—का हूं न्हाई. मंग म्या मनाचा धडा केला. दवत दवत दारापसवर आलों. हळूच मदी डोकावून बगितलं. पयल्यांदा काईच दिसलं न्हाई; पर पुना थोडं पुढं हून बगितलं. तंवा मला गुजावाय दिसली. एका कोपऱ्यांत—तिनं सतरंजी हातरली व्हती आन् उदासल्यावनी ती सतरंजीवर पडली व्हती. तिनं अजून अंगूळ बी केल्यावनी दिसत न्हवती. झोपतंनं उठलेलं मानूस दिसावं तशी ती दिसत व्हती. म्या अजून थोडं पुढं झालो. गुजावायनं माझ्याकडं बगावं म्हनून हटकून दारांत उभा ऱ्हायलों. पर ती हालली न्हाई का माझ्याकडं बगितलं न्हाई. उदासली नजर लावून ती कुठं तरी बगत ऱ्हायली. मला पंचाईत पडली. काय- करावं काई कळंना. ती आतां बगील, मंग बगील म्हनून बक्कळ वाट बगितली. आखीरला ती बगीनां तंवा म्या हातांतलं पुस्तक दाराला हानलं. गुजावायनं माझ्याकडं बगावं म्हनून मुद्दामच सोंग केलं. म्या—तसं सोंग केलं पर उपेगाला आलं. आवाज झाल्यावरूबर गुजावायनं दाराकडं बगितलं. आन् म्या समुर दिसल्यावर उगीचच अंगाची हलवाहलव केली. पडलेल्या जागंवरनच ती म्हनाली—

"ये की रं.

विन पाळलेलं कुतरं दवत दवत एकांद्याच्या वाड्यांत शिरावं तसं म्या गुजाबायच्या घरांत आलों. गुजावायच्या म्होर हूमा ऱ्हायलों. थिजलेल्या नदरंनं माझ्याकडं वगत गुजावायनं इचारलं—

"भूका लागल्या का तुला?"

म्या म्हनलं—"अजूक न्हाई.

"लागली असली तर लाजू नकु. शिक्यावर रोटी हाय, काढून घे. म्या दोडानंच वाढायी फायजी तुला; पर काय करूं. उठावंच वाटंना बग मला."

गुजावायला काय व्हतंय हें अजूनबी मला कळलं न्हवतं म्हनून म्या इचारलं.

"काय दुखतंया गुजावाय तुमचं?"

"जिवाला बरं न्हाई बाबा"

"डोस्कं दुखतं व्हयं?"

"डोस्क दुखत असतं तर बरं झालं असतं. कुनाकडनं अवशिदपानी तरी घेतां आलं असतं."

"मंग काय दुखतंया ?"

"जिवाला करमत न्हाई वग. कसं उदास उदासच वाटायलाया."

"मंग आपुन काय तरी खेळ खेळू. जिवाला गोड वाटंल तुमच्या"

"एक खेळ खेळाया लागलेय की ! अजूक कसला खेळ खेळाया लावतोस?"

"लई मजेदार हाय. तुमी बगा तर अेकदा."

"तूं खेळ. म्या वगते."

"एकल्यानं खेळाया येत न्हाई. दोगं तरी लागतेत तो खेळ खेळायला"

म्या आसं लई इनविलं तंवा गुजावाय मोठ्या मुश्किलीनं व्हय म्हनाली. मंग म्या आपली पाटी—पुस्तक बाजूला टिवलीं. गुजावायच्या म्होर बसलों. गुजावायला माजीं हाताचीं बोटं दावलीं. मंग म्या माजा हात म्हांग न्हेला. बोटाची जुडी केली. गुजावायच्या म्होरं धरली. आन् गुजावायला मधलं बोट वळकायला सांगितलं. गुजावायनं माझ्या बोटाकडं बगितलं आन् तिला मधलं वाटलं तें बोट तिनं धरलं, म्या बोटाची जुडी सोडली. गुजावाय फसली व्हती! मधलं बोट म्हनून तिनं आंगठ्या जवळचं बोट धरलं व्हतं. गुजावाय आसी फसली तंवा टाळ्या वडवित म्या म्हनालो,

"हैं. गुजावाय फसली. कोपऱ्यांत बसली! गुजावाय फसली कोपऱ्यांत बसली."

मला वाटलं व्हतं, गुजावायला आस खिजविल्यावर ती चढीला पेटंल. हिरीरीनं बोटं धरायला सांगील; पर तसं काई तिनं केलं न्हाई. म्या परत बोटाची जुडी केली गुजावायला मधलं बोट वळकायला सांगितलं.



अनुक्रमणिका

गुजाबायनं माह्या बोटाकडं फायलं. तिला वाटलं ते बोट तिनं धरलं; पर आतांबी गुजाबाय फसली व्हती. आतांतर करंगळी जवळचं बोटच मधलं बोट म्हनून धरलं व्हतं. आतांबी म्या टाळ्या पिटीत म्हनालो–

"हॅं. गुजाबाय फसली. कोपऱ्यांत बसली–गुजाबाय फसली कोपऱ्यांत बसली!"

आतां मातर गुजाबायला उलिसा चेव आला. पडल्या पडल्याच तिनं सावरल्यावनी केलं आन् माह्या बोटाकडं बगत ती म्हनाली,

"आतां धर बोटं. आतां वळकिते का न्हाओ बग"

गुजाबाय आसं म्हनाली तंवा मलाबी थोडी इरसरी चढली. म्या पाठीम्हागं हात केला. बोटावर बोटं घातलीं. गुजाबायला वळकायला सांगितलं. गुजाबायनं बारक्या नदरनं माह्या बोटांकडं बगितलं आन् बराबर माजं मधलं बोट वळकिलं. मंग म्या गुजाबायला बोटं धरायला सांगितलीं. गुजाबायनं बोटं धरलीं. पयल्या बारीला म्या वरूवर तिचं मधलं बोट वळकिलं. पर दुसऱ्या बारीला मातर तिनं मला फसविलं.

जरा येळानं गुजाबायला या खेळाचा कंटाळा आला. गुजाबायला कंटाळा आला तर मलाबी कंटाळा आला. म्या म्हनलं–

"आतां दुसरा खेळ खेळूं."

तिनं इचारलं–

"आतां अजून कसला खेळायचा?"

म्या माजा हात खालीं ठिवला. गुजाबायला त्याच्या वर बुक्की हानायला सांगितली. गुजाबायनं हळूच हातावर बुक्की हानली. म्या म्हनलं,

"अजूक जोरांत मारा."

गुजाबायनं जोरांत बुक्की मारली. म्या पटकन् हात काढून घेतला. म्या हात काढून घेतल्यावरूवर गुजाबायच्या हाताला भुईचा जोरांत दनका बसला. दनका बसल्यावर गुजाबाय इवळली. म्या मातर हसाया लागलो. म्या आसं हसाया लागलों तंवा मातर गुजाबाय इरसरीला आली. आतां पसवर ती निजून खेळत व्हती. पर आतां मातर ती उठून बसली. काकणं म्हांग सारीत म्हनाली–

"आतां ठिव हात खालीं. बगूं आतां कसं खेळतोस ते."

म्या माजा हात खाली ठिवला. गुजाबायनं जोरांत हात उगारला. मला वाटलं आतां ती जोरांत हाननार. माजा हात म्या काढून घेतला. हात काढून घेतला पर उपेग काओ झाला न्हाई. गुजाबायनं हात हानलाच न्हाई. तिच्या हाताला लागलंच न्हाओ. तिनं दोन तीनदां आसं केलं. मला वाटलं. गुजाबाय आतां काओ जल्दी हातावर हात हानीत न्हाओ. म्या आपला खुशाल हात खालीं ठेवून बसलो. गुजाबायनं बराबर वळकिलं. तिनं दणकन माज्या हातावर हात हानला. हातावर दनका बसल्यावरूवर हाताला झिनझिन्या आल्या. म्या तोंडानं इवळाया लागलों. हातावर फुकल्यावनी करीत हात झाडाया लागलों. रडकुंडीला आल्यावनी झालं मला. म्या रडकुंडीला आलों; आन् गुजाबाय मातर फिदी फिदी हसाया लागली. एवढ्यावरनंच म्या वळकिलं. आतां काई खालीं हात ठेवन्यांत सोय न्हवती. गुजाबाय अजूनबी फिदी फिदी हसतच व्हती. मंग म्याच तिला म्हनलो–

"आतां तुमी ठिवा हात खालीं."

तिनं हात खाली ठिवला. म्या एकदम हात वर उगारला आन् गुजाबायच्या हातावर दनका मारला. पयल्याच टिपीऱ्याला म्या असा दनका मारीन आसं गुजाबायला वाटलं न्हवतं. म्हनून तिला माजं कवतिक बी वाटलं आन् माजा रागबी आला. ती हात खालीं ठिवीत मला म्हनाली–

"आतां मार वरं."

पर आतां अजून खेळन्यांत माजा फायदा न्हवता. माजं उसनं म्या घेतलं व्हतं. म्हनून म्या म्हनलो–

"आतां पुरं हा खेळ. दुसरं कायतरी खेळूं आतां."

माजा गालगुच्या घेत गुजाबाय म्हनाली

"वा ग भागूबाई! बांगड्या भरतोस का हातांत?"

ती माजा गालगूचा घ्याया लागली तंवा म्या सपकन् तिला एक सपका मारला. सपका मारल्यावर ती मला धराया लागली. पर तिनं धरायच्या आगुदर म्या तिथनं पळालों. तीबी माज्या म्हागं आली. मला धरायला बगाया लागली. म्या तिला हुलकावन्या द्याया लागलो. शिवनापानीच खेळाया लागलों आमी. कंबा कंबा म्या तिला जवळ येवं द्यायचा, ये ये म्हनून हातानं खुणवायचा आन् ती जवळ आली म्हंजी तिला चकली द्यायचा. म्या अंगानं बारीक असल्यामुळं कस्याखालूनबी निसटायचा. म्या आसं निसटलों म्हंजी ती कवतिकानं माह्याकडं बगायची. पुना मला धरायला यायची. आखीरला म्या दमलों. मला जोरांत पळायला यीना. आखीरला तिनं मला कोनाड्यात गांठलं. माज्या हातावर हात मारला. आन् मला खिजविल्यावनी करीत ती म्हनाली–

"चल ये पोरा. तुज्या नाकांत दोरा."

म्या सवागती हुभारल्यावनी केलं आन् एकदम तिला शिवायला गेलों, पर तिच्यापसवर जान्या अदुगरच ती तिथनं निसटली. म्या बी तिच्या म्हागं म्हागं पळालों. तिला धरायला बगाया लागलों; पर कट केल्या ती मला गवसना. ती आसंच मला जवळ यिऊं द्यायची. आतां म्या तिला धरतो आसं मला वाटायचं; पर ती पटकन् तिथनं पळायची. फिदी फिदी हसाया लागायची. म्या वक्कळ पळालों. तिला धरायला बगितलं पर ती काई गवसंना. म्या आतां रडकुंडीला आलों. रडायच्या बेताला आलों; पर तिला मातर त्याचं काई वाटेना. ती मला चकल्या माराया लागली. वरचे वर कलुलीला आल्यावनी कराया लागली. जोरा जोरानं हसाया लागली. मला वाकुलं दावाया लागली. म्या मातर दमलों. पळायला अवसानच न्हायलं न्हाई. तिनं हे वळकिलं. ती माझ्याजवळ आली. माझा गालगुच्या घिऊन पळाली. म्या हात उगारला तिच्या म्हागं लागलों. ती सतरंजीवर उताणी पडली. जोरा जोरांत हसाया लागली. लई राग आला मला गुजाबायचा. म्या तिच्याजवळ गेलों. तिचा गालगुचा घिऊन पळाया लागलों. पर तिनं पटकन् माजा हात धरला आन् खसकन् खालीं वडल.







अनुक्रमणिका

म्या ढोपरावर जोरांत आदळलों. आदळल्या बरूवर कळा या निगाया लागल्या. म्या तिच्यावर हात उगारून म्हनलों–

"लागलं की मला."

ती काई वोलली न्हाई; पर जीभ मातर भाईर काढली. मला येडावून दावलं. तिनं जीभ काढल्यावरूबर म्यावी जीभ भाईर काढली. ती जसं कराया लागली तस म्या वी कराया लागलो. जिबल्याचाच खेळ चलाया लागला आमचा. जरा येळ असा खेळ झाल्यावर तिनं हात लांबविला. खसकन् माजी जीभ वढली. म्या वी तिची जीभ वढाया वगितली; पर तिनं पटकन् जीभ आंत मंदी घेतली–आन् खदाखदा हसाया लागली. लई राग आला मला गुजावायचा. गुजावायसंग आतां खेळायचं न्हाई; तिला वोलायचंवी न्हाई आसं म्या ठरविलं. म्या तिच्यावर रुसलो. गाल फुगवून वसून न्हायलों. तिनं मला हांक मारली. माज्या तोंडाजवळ तोंड आनलं. पर म्या तोंड फिरविलं. म्या अस्यातस्यानं वोलंना तंवा नवल दावीत गुजा म्हनाली,

"आतां गो वयो. वराच दिसतो की वं राग तुमचा!"

तरी वी म्या काई वोललों न्हाई. गुजाबायनं माज्या तोंडाजवळ तोंड आनलं. आन् हसत मला इचारलं–

"आतां वोलायचं न्हाई म्हना की."

वसल्या जागीच म्या फिरल्यावनी केलं. मला वोलायचं नसल्याचं सांगितलं. म्या अस्यातस्यानं वोलत न्हाई आसं दिसल्यावर गुजावाय पुढं सरली आन् मला गुदगुल्या कराया लागली. ती गुदगुल्या कराया लागली तंवा म्यावी तिला गुदगुल्या कराया लागलों. तिला गुदगुल्या सोसत न्हवत्या. गुदगुल्यानं तिची वेजारी व्हाया लागली पडल्या पडल्याच ती अंग वांकडं तिकडं कराया लागली. खळखळून हसाया लागली. तिला गुदगुल्या सोसत न्हाईत आसं दिसल्यावर म्या चढीला आलों. तिच्या अंगावर पडून तिला गुदगुल्या कराया लागलों. रिंगनांत फिरल्यावनी ती फिराया लागली. दम लागला तरी हसाया लागली. म्या गुदगुल्या थांबवीत न्हाई आसं दिसल्यावर ती माजे हात धराया लागली; पर म्या काई तिला हात धरूं दीना. आखीरला तिनं काय तरी करावं म्हणून माजं नाक धरलं. आन् खसकन् वढलं. तिनं नाक धरल्यावर म्या बी तिचं धरलं आन् जोरानं वढीत म्हनालों,

"वढचील, वढचील, का नाक माजं?"

ती पुना माजं नाक धरून वढीत म्हनाली–

"वढते! वढते! वढते!!"

तिनं माजं नाक धरलं. म्या तिचं नाक धरलं. ती माजं नाक वढाया लागली. म्या तिच नाक वढाया लागलों. म्या जोरांत वढाया लागलो की तीवी जोरांत वढाया लागली. नाक वढतांना ती हसाया लागली; पर माजी मातर वेजारी व्हाया लागली. नाक दुखाया लागलं. डोळ्यांत पानी आलं. तोंड लालबुंद झालं. नाक सोडवायची म्या वक्कळ कोशीस कराया लागलों पर ती काई सोडीना. सोडवायला गेलं की जास्तच वढ वसाया लागली. माजा जीव वेजार झाला. अस्यातस्यानं गुणावाय नाक सोडीत न्हाई आसं दिसल्यावर म्या एकदम भोकाड पसरलं. जोरा जोरांत म्या रडाया लागलों. गुजाबायनं दचकून माझ्याकडं वगितलं. वारीक नदरनं वगितलं. आन् खातरी झाल्यावर तिच्या तोंडावर राग उतराया लागला. तिचे डोळे लाल व्हाया लागले. नाकपुड्या हलाया लागल्या. व्हट थरथराया लागले. तिला आसं वगितल्यावर म्या घावरलों. रडनं कुठल्या कुठं गेलं. तिचं भ्या वाटाया लागलं. तिनं जरायेळ माझ्याकडं रागानं वगितलं आन् मंग ती मोठ्यानं मला म्हनाली,

"तूं न्हय?....चल हूं घराच्या भाईर. सोताजवळ हिंमत न्हवती तर कस्याला आनलंस मला हितंवर? असा का अर्ध्यावरच खेळ टाकलास?"

म्या खेळ निम्याच खेळला न्हता. खेळ आरध्यावर आल्यावर मोडला न्हता खरा; पर तेवढ्यासाठीं एवढं रागावलेलं म्या कंदी कुनाला वगितलं न्हवतं. मी भांबावलों. काय करावं काई कळंना. मी हालत न्हाई आसं दिसल्यावर गुजावाय तरातरा फुडं आली. माज्या हाताला धरलं. फरा फरा वढीत दारापसवर आनलं. दाराच्या भाईर फिकून धाडकन् दार लोटून दिलं.

म्या वेड्यावनी दाराकडं वगाया लागलों. गुजावायचा आवाज याया लागला. मधल्यामदी कळा दाबल्यावनी वाटाया लागलं. कन्हल्यावनी आवाज याया लागला. गुजावाय



'हार्मनी'

कायतरी सोसाया लागली. दुख वाढाया लागलं. आवाज वाढाया लागला. आवाज लईच झाला आन् मंग दनकन् भितीवर आवाज झाला. काय तरी फेकून टाकल्यावनी वाटलं. एकवार आसं झालं आन् मंग धडा धड आवाज याया लागले. म्या हळूंच उठलों. दारापसवर गेलों. फटींतून आंतमंदी बगितलं. गुजावाय भलतीच बिगडली व्हती. तिची नजर तारवटली व्हती. केस इस्कटले व्हते. डोक्यावरचा पदर भुईवर लोळत व्हता. पर गुजावायला कस्याची दखल न्हवती. हाताला लागलं तें गुजावाय फेकीत व्हती. दणादण आवाज येत व्हते. तांब्याला वोंदे पडत व्हते. परतीचा आकार बिगडत व्हता. वाटचाना कोन निगत व्हते. पर गुजावायच्या ध्यानी आसलं काई न्हवतं. ती परात बगत न्हवती, तवा बगत न्हवती, काटवट बगत न्हवती. उलथनं बगत न्हवती, हाताला लागंल तें फेकीत व्हती. आवाजानं सारं घर दणाणत व्हतं. गुजावायनं आशी फेकाफेक केली. फेकाया सारकं काई न्हायलं हाई तंवा ती उतरंडीकडं वळली. उतरंडी लोटून द्याया लागली. धडाधड आवाज याया लागले. गाडगे फुटाया लागले. बारीक सारीक जिनसा सांडाया लागल्या. एकून एकांत मिसळाया लागल्या. रखुंदळ व्हाया लागला. समद्या उतरंडी लोटल्या तंवा ती मटकुल्याकडं वळली. मटकुले लवंडाया लागली. सलदं पालथे कराया लागली. कस्यांतवी काई मिसळाया लागलं. जुंदळचांत गहूं तर गव्हांत दाळ. दाळींत साळ तर साळींत जवस. सगळ्याचं मातर. गुजावायला धाप लागली. अंगांतनं पानी व्हाया लागलं. तिचा झोक जाया लागला. ती मोप सावराया लागली; पर सावराया जमंना. लोटून दिल्यावनी ती खाली पडली. सपशेल तोंडावर पडली. धपकन् आवाज झाला. पुना कसला आवाज न्हाई का काई न्हाआी. निशा चढल्यावर माजा चुलता पडून न्हातो तशी ती पडून न्हायली. गप्पगार.

म्या कंवा सकाळीं जेवलों व्हतों. पोटांत खंडीभर भूक लागली व्हती. गुजावायला उठवावं, भूक लागली म्हनून सांगावं आसं वाटत व्हतं; पर कसं उठवावं काई कळत न्हवतं....

●●●
















—दत्ता कदम

## अंक पहिला

**शहर** पुण्यावर कोवळ्या किरणांची अुधळण झाली. वाडे व हवेल्या गजबजून अुठल्या. पांखरांच्या भूपाळीशीं घोड्यांच्या टापांनीं यमक सावलं. नव्यानंच निर्माण झालेल्या पेठांनीं नव्या अुमेदीची लय टिपली.

नांदत्या खेळत्या वाड्यांत नानाहि जागे झाले. मअु मअु दुलअी नानांनी बाजूला केली. अुठले. संवयीप्रमाणं त्यांनी कानांतली बिगवाळी चांचपली. भिंतीवरच्या एका रूपवतीच्या चित्राकडं बघून नाना स्वतःशींच मंद हंसले. त्यांनीं दोन्ही हातावरच्या रेषा पाहिल्या. त्या रूपवतीनं त्यांना अगदीं हळवं बनवलं होतं. तरी स्त्रीच्या लावण्याचं नानांचं वेड तिथंच थांबलेलं नव्हतं.

सकाळचीं सगळीं कामं आटपली. स्नानसंध्या झाली. वास्तविक नाश्ता झाल्यावर नाना शनवारवाड्याची वाट धरीत असत पण त्या दिवशीं त्यांनी स्वतःचा वाडा सोडलाच नाहीं.

त्यांच्या हालचालींतून हें अुघड दिसत होतं कीं ते कुणाची तरी वाट बघत होते. दालनांत येरझारा घालून पाय दमल्यासारखे वाटले म्हणून त्यांनी बैठक घेतली आणि अेक दप्तर सोडलं. शहर पुण्यांत कोतवाली सुरू करण्याचं पेशव्यांनीं ठरवलं होतं व तें दप्तर त्यातलच होतं. बळेंच नानांनीं त्यांत डोळे खुपसले, चित्त खुपसलं तरी तंद्री कांहीं लागली नाहीं. त्यांनीं दप्तर बाजूला केलं. पुन्हां वाट पाहिली.

पुन्हां वाट पाहिली तेव्हां अंदाज खरा ठरला. नानांचा चेहरा टवटवला. त्यांच्या नजरेंत किमया अुफाडली. त्या रूपवतीच्या चित्राकडं बघून त्यांनीं डोळे मिचवले. स्वतःच्या प्रौढपणांतल्या पोरपणाची त्यांना गंमत वाटली. कोपऱ्यांतल्या आयन्यांत त्यांना त्यांची छबी दिसतांच ते मान अुडवून अुद्गारले, 'बराच आहेस कीं रे तूं नाना ! समजलें समजलें.. माणूस असाहि बराच असला तरी बिघडतें कोठे ? सौंदर्याचा हट्ट आम्हीं करायचा नाही तर करायचा तरी कोणी ? पण हा हा आमचा देह मात्र किरकोळ वाटतो.. खरें खरें.. पौरुषसुद्धां बाळसेदार हवेंच. त्या रघुनाथपंतांचा देह कसा नांवाजण्यासारखा आहे.. असो आमच्यापाशीं अक्कल आहे.. त्यांच्यापाशीं देह आहे.. असो असो.. सौंदर्याची पर्वणी साधायलासुद्धां अक्कल लागतेच. कसें काय नाना ठीक आहे ना ?" नानांनी खुषीनं छबीकडे पाहून विचारलं. स्वतःशी मोहरेदार हंसले. हलकेंच पुढं म्हणाले, 'तो मेवाडचा व्यापारी येअील्च आतां पायठण्या चढून. आज मौज







*"हूं....हूं....लछमन, आज हिच्या-पुढं कचेरी सुचेलशी वाटत नाहीं....आऽऽ आणि हिच्यापेक्षा दुसरी कोणी लावण्यवती असेलशी वाटत नाहीं."*

*नानांनीं भुंवई वर चढविली. त्यांच्या मनांत शृंगाराच्या शुक्रानं नवी गिरकी घेतली....*

---

आहे आणि या मौजेतून अुद्यां चंगळ होणार आहे...

बोलतां बोलतां नानांच्या कानांनीं पायरव घेतला. नानांनीं वळून दाराकडं पाहिलं. दाराच्या चौकटींत अुभ्या असलेल्या इसमानं माथं लववून म्हटलं, 'मुजरा मालक मुजरा'

'कोण लछमन ? या या.. तुमचीच सारखी वाट वघत आहे.'

'म्हणजे ऽऽऽ कचेरी ?'

'कचेरी आहेच. अहो फडणीशी जन्माचीच. पण रक्त आहे तोंवर रग आहे आणि रग आहे तोंवर रमणी आहे विलास आहे आणि ऽऽ' नाना म्हणाले.

'कळलें मालक कळलें, पुढचें सारें कळलें. आम्हीं तर अकलेपेक्षां रसिकपणाच शिकण्यासाठीं मेवाडांतुन तुमच्या पायाशी येतों ना.' लछमन बैठकीवर वसून म्हणाला.

'असेल असेल. पण लछमन..'

'जी मालक'

'आम्हींसुद्धां जिभेचा गोडवा त्याच वेळीं तुमच्याकडून शिकतों.'

दोघांनाहि अेकमेकांच्या वोलण्याचा रोख पटला. मोठं खळाळून हंसले दोघे.

नकळत त्या रूपवतीच्या चित्राकंड वघून नानांनीं विगवाळी चांचपली. ते सुद्धां लछमनच्या शेजारीं वसले. अगदीं मित्राप्रमाणं.

नाना म्हणाले, 'दाखवा, डोळे कसे भुकेलेत.' आणलेल्यापैकीं एक चित्र नानांच्या हातीं देत लछमननं सांगितलं, 'त्या समोरच्या रूपवतीपेक्षां ही हजारपटीनें रूपवती आहे मालक. खानदानी तिच्याकडे कांठोकांठ भरलेली आहे. आऽऽऽणि कानांत सांगायचें म्हणजे ऽऽ'

'काय लछमन ?' चित्रांतल्या रूपवतीच्या डोळ्याला डोळा भिडवून नानांनी विचारलं, स्वराच्या प्रत्येक कंपनांत अधीरून विचारलं.

'नुकतीच पुष्पवती झालेली असून

'हूं ?'

'मिळण्यासारखी

'लछमन लछमन हे डोळेसुद्धां मला तेंच विचारत आहेत...मेवाड आणि शहर पुणें यांत विंध्याद्रि आडवा कां ?

'मालक मालक, तुमच्या रसवंतीनें आज कालीदासजगन्नाथालाहि लाजवलें आहे.'

'तें काय जाणायचें असेल तें तुम्ही जाणून घ्यां. पण या ओठांच्या पटावर जुवा खेळायलाच हवा. या ओठांत आव्हान आहे, या ओठांत आवाहन आहे. लछमन'

'जी मालक—'

'हिच्या नाकपुड्या कशा थरथरत आहेत वघा.'

'मालक सावध व्हा मालक. अेकाहून अेक सरस चार रूपवतींची चित्रें अजून वघायचीं आहेत त्यांच्यावद्दलच्या सुरस कथा...'

'पण लछमन, पेशव्यांचें राजकारण खेळणाऱ्या या फडणीस नानाला साधी गोष्टसुद्धां कळत नाहीं असें वाटतें ?'

'को कोणती मालक ?' कांहीं चुकलें कीं काय या विचारानं गोंधळून लछमननं विचारलं.

'सर्वप्रथम कोणी कोणाला चांगलें तें दाखवतो कीं खराव तें दाखवतो?' नानांनी धारदार विचारलं.

नानांच्या त्या प्रश्नानं लछमन वावरला. खऱ्याखुऱ्या रूपवतींचीं दुसरींहि चार चित्रें नानांच्या अलमारीत त्याला अडकवायचीं होतीं. नानांना देतां येइल तेवढं सूख मिळवून द्यायचं होतं आणि स्वतःच्या व्यवहारांत खोट खायची नव्हती.

वोलण्याची वाट सगळी वदलण्याच्या हेतूनं लछमन म्हणाला, 'मालक, आपण नेहमीं चांगले तेंच घ्यावें. लहर लागेल तेव्हां इतर रूपवतींची आठवण पडेलच. सगळ्या आपल्याच आहेत. तुमच्याच हुकुमाचे आम्हीं तावेदार..

'लछमन तुम्ही मोठे मतलवी खरे.'

'नाही नाही मालक, तुम्हांला हा ओठांचा पट जुवा खेळायला मिळावा, अेवढी इच्छा आहे..त्या समोरच्या रूपवतीप्रमाणें ऽ'



**प्रवासी**

जातों वेंगळूरा । अगा मी प्रवासी
दमण गोव्यासी । हैद्रावादा
नव्या 'तीर्थ'क्षेत्रीं । व्हा रे शुचिर्भूत
अैसा वरदहस्त । कायद्याचा

—आंद्री.

'लछमन अधिक वोलणें नको. आमची ओळख तुम्हांला आहे, तुमची ओळख आम्हांला आहे. राजकारणाच्या धकाधकींतून पुन्हां मन ताजें करणारा हाच रम्य विरंगुळा आहे. ठीक ठीक. आज पुढचीं चित्रें पहावींशींच वाटत नाहीत. असेल तें हेंच अणि हीच..तुम्हीं अचूक शिकार केली आहे लछमन.'

नानांचा खुलता चेहरा लक्षांत घेऊन लछमन म्हणाला, 'मालक, अेकदां श्रीमंतांच्याशीं गांठ घालून द्या आमची.. पुढचें आम्हीं पहातों..'

'लछमन' नाना ओरडलेच 'परीसानें लोखंडाचें सोनें होतें, लोखंडानें नव्हे. गंगेच्या पाण्यांत नव्हे तर गाळांत तुमची जीभ धुवून घ्यां'

नानांच्या वोलण्यांनं लछमनचा सारा असामीपणा कोलमडला. पेशव्यांच्याकडून या वावतींत आपल्याला घवाड मिळेल असा लछमनचा कयास होता. म्हणून त्यानं प्रश्न काढला खरा पण त्याचीं आंतडीं वाहेर आलीं. नाड्या नाड्यांत तो शरमिंदा झाला. नानांच्या मनांतल्या पेशव्यांच्यावद्दलच्या आदरानं तो स्तिमित झाला.

लछमन गप्प झाला. कांहीं कांही वोलला नाहीं.

पुन्हां नानांचे डोळे त्या रूपवतीच्या चित्रांवर खिळतांच नाना मुर्खफुकासारखे हंसले. त्यांना हंसतांना वघून लछमनच्या डोक्यावरचा भार कमी झाला.

नानांनीं हळुवार साद घातली, 'लछमन'

'जी मालक–'

'ही स्वतःच घडा घेअून पाण्याला जाते काय ?'

'होय मालक, ती रानफुलीच आहे. तिची अेक जिवाभावाची सखी आहे आणि तिच्या-वरोबर ती सारखी पाणवठ्यावरच असते.'

'म्हणजे जळवंतीच आहे म्हणा.'

'खरें खरें मालक. पण हें जाणलेंत कसें ?

त्यांच्या वाडचाइतकं नाना हंसून म्हणाले, 'म्हणून तर मी नाना आणि तुम्ही लछमन.'

'जी मालक, पटलें.'

'भुंगा आहे ना भुंगा.'

'जी'

'तो काय करतो ?'

'कठीण लाकूड पोखरतो.'

'हूं. आणि त्याचवरोवर कमळकोषांतहि शिरतो. कळलें लछमन ? ज्याची कला त्यालाच माहित. कांही प्रश्न असे असतात कीं त्यांची अुत्तरें कधीं शोधूं नयेत. मुग्धपणांतच जगांतला सारा आनंद, सारें सुख आहे. हूं.. हूं.. लछमन आज हिच्यापुढं कचेरी सुचेलशी वाटत नाही....आऽऽआणि हिच्यापेक्षां दुसरी कोणी लावण्यवती असेलशी वाटत नाहीं...'

पण नानांचे शब्द वरच्यावर झेलले गेले. नानांच्या अगदीं काखेंतल्या केसापरी असलेले कांचनपंत तिथं आले व वजनदार आवाजानं म्हणाले, 'नाना तुम्हीं भ्रमांत आहांत भ्रमांत. या रूपवतीच्या नाकावर नाचणारी मदालसा याच शहर पुण्यांत आलेली आहे.'

कांचनपंतांच्या वोलण्यानं लछमन भोंव-ऱ्यांत सांपडल्यागत झाला.

नानांनी भुवयी वर चढवली. त्यांच्या नज-रेंत प्रश्न अुगवला. त्यांच्या मनांत शृंगाराच्या शुक्रानं नवी गिरकी घेतली.

## अंक दुसरा

...या मेवाडच्या रानफुलीच्या चित्राकडेहि तेव्हांपासून लक्ष लागेनासें झालें आहे. आज-वरच्या कांचनपंतांच्या मित्रपणावरून ते टीचभराचे हातभर कधीं करणार नाहीत या वद्दल भरंवसा वाटतो. नांव तरी किती गोड.... ललिता गौरी अं ? ... हूं हूं .. ललितागौरी.. म्हणे पुण्यावाहेरची आहे कांचनपंत तर म्हणत होते कीं तिचा वाप नशीब काढायला शहर पुण्यांत आला आहे... अस्सें ठीक ठीक ललितागौरी काय असेल तें असो पण तिचें वर्णन कांचनपंतांच्याच तोंडून अैकायला हवें इतके दिवस मी'याच .. याच विचारांत आहे आज तर आकाशाची निळाअी अधिकच गडद वाटते... क्षितिजाची गोलाई अधिकच नाहीं नाहीं, जिथें तिथें न पाहिलेली ललितागौरीच भरलेली स्वतः भारलेली मला भारणारी शृंगाराचें चोरकप्पेसुद्धां अजवर अनुभवले पण अशी आगळी ओढ प्रथमच मनभर होत आहे स्त्रीचें मन तें मन आणि देह तो देह स्त्रीच्या देहांत असतें तें स्त्रीच्या मनांत नसतें.. पण.. पण असें कां होतें ? सृष्टी अशी गरगरते कां ? झाडें अशी पालेतात कां ? झाडांची अशी पानझड कां होते ? वोलतां वोलतां आअीची आठवण कां होते ? स्त्रीच्या देहांत नाहीं नाहीं, कांहीं सुचत नाहीं, कळत नाही खडकावरचें वीं म्हणतात सुकून जातें स्त्रीच्या मनांत हूं हूं ललितागौरी चवरी पावरी वावरी माझ्या करीं माझ्या अुरीं अशानें हा नाना फुकट जाअील फुकट जाअील दप्तर कुठें आहे ? दप्तर

लगालगा नानांनीं दप्तर घेतलं.

दप्तरांत हात घातले. मग डोकं घातलं. पण डोकं पुरतं भटकायला लागलं. नव्यानं-सुरूं होणाऱ्या पुण्याच्या कोतवालीवद्दलचं तें दप्तर होतं. पुन्हां ललितागौरी अुत्सवासारखी मनांत आली नानांच्या तिचा वाप म्हणे नशीव काढायला आला आहे. आणि पोटची पोर आहे रूपाची खाण. धनाची पेटीच.

त्या मदालसेच्या भुलवणांत नाना मश्गूल असतांनाच त्यांच्या कानांवर हलकेच साद पडली, 'नाना'–

नानांनीं मान वळवून पाहिलं. त्यांचे डोळे जांभुळले. त्यांनीं आंसावून विचारलं, 'कोण कांचनपंत ?'

'होय मीच.'

'वसा.'

'होय, पण हें असें काय ? पुढ्यांत दप्तर विसकटलेलें, नजर वाहेरच्या आकाशाकडे.'

'कांचनपंत, लपवूं कशाला ? आम्ही पेश-व्यांच्या राजकारणाचें धोरणी धुरीण जरी असलों तरी आयुष्याच्या कानामात्रा आम्हांला चुकलेल्या नाहीत. निराकार निर्गुण आकाशांत आमची नजर ललितागौरीच्या सगुणरूपाचा वेध घेत आहे. तुमच्याविना आम्हीं हें कुणाला सांगूं शकत नाही... हें कामचक्र मोठें विपरीत खरें. स्वप्नाचें व जागृतीचें सारें अस्तित्व त्यांत पिळून निघतें.'

'पण तुमची ही अवस्था पेशव्यांच्या कानां-वर गेली तर ?' कांचनपंतांनी खाजगी आवा-जांत विचारलं.

'तर ? कांचनपंत, शहर पुण्याच्या रस्या-वर आणखी अेक कुत्रा भुंकतांना दिसेल...पण नाहीं नाहीं नाना हें कधीं सहन करणार नाहीं. आम्हीं पेशव्यांचे आहों तसें आम्हीं आमचेहि आहों. वोला कांचनपंत, मन मारा-यचें तरी किती ? मन मारूनच ही अशी कुडी झाली ना ?'

कांचनपंत कांहीं वोलायच्या आंतच नाना अुठले. अलमारींतून त्यांनी लछमननें दिलेली आणखी चार चित्रें काढलीं. चित्राचित्रावर त्यांची आधाशी दृष्टी भुरभुरली. अखेरीस रानफुलीचंहि चित्र त्यांनी जवळ घेतलं. तिचे गाल कुस्करले, नाक ओढलं.

पण स्पर्शाचंहि समाधान नानांच्या हाताला लागलं नाहीं तेव्हां नाना समुद्रासारखे पुटपुटले, 'ललितागौरी.'

त्या भरांतच नानांनीं रानफुलीचं चित्र ठेवून दिलं आणि विगवाळी चांचपून कांचन-पंतांना विचारलं, 'काय तिचा वाप नशीव काढायला आला आहे ना?'

'होय होय. मागेच तुम्हांला मी सांगितलें आहे. काय तुम्हीं त्याला नशीव देणार आहांत?'

'कांचनपंत ?' कांहीं तरी चित्तांत लखा-खल्यासारखं नाना म्हणाले.

कांचनपंत फक्त हंसले... फक्त.

नानांच्या मनावर त्या हास्याचा वार झाला. नाना म्हणाले, 'कांचनपंत, या नानाच्या सावली-सारखे तुम्हीं वावरत आहांत पण या नानाची तुम्हांला ओळख पटलेली दिसत नाहीं. हें तुमचें दुर्दैव नाहीं माझें माझें

'नाना नाना, असा अुगा त्रागा करून घेऊं नका. तुमच्या अुष्टयावर जगणारें मी पिशाच्च, हात जोडून सेवेला तयार. सोन्याचा कस फक्त अश्माच जोखतो. आमच्या तोंडची वाफ फुकाचीच. तुमची मला ओळख पटलेली नसती







अनुक्रमणिका

तर ललितागौरीची माहिती आणली असती काय ? नाना तुम्ही बोलते आहां, कर्ते आहां...'

'आम्हांला माहीत आहे. त्याचा मंत्रजागर नको. नाहीतर मेवाडचा चित्रकार व्यापारी इथवर खेटे घालता ना ! कांचनपंत कांचनपंत .. मनाला तहान लागली आहे केवळ त्या ललितागौरीची.'

'नाना, तुम्हीं असे हळवे व्हायचें ? तुम्ही हुकूम करायचा.'

'कांचनपंत, इष्काच्यो राज्यांत हुकुमाला जागा नाहीं... कांचनपंत तिच्या हनुवटीवर तीळ असल्याचें तुम्हीं सांगत होतां नाहीं ?'

'होय नाना, तुमच्याआधीं तो गुलाम तिच्या हनुवटीवर जाऊन बसला आहे.'

'त्याचा मला हेवा वाटतो.' आणि...

नाना थांवले. असे थांवले कीं आकाशाची निळाई फिकी झाल्यासारखी वाटली. वरच्या झुंबराचं त्यांच्या थांवण्याकडे लक्ष गेलं. वारा आला. झुंबर मंद हिंदोळलं. तेव्हां नानांचं त्याच्याकडं लक्ष गेलं. त्याच्या सांध्यासांध्यांत स्वतःची प्रतिमा वघतांच नाना जरा सावध झाले तरी स्वतःचीं असंख्य रूपं त्यांच्या मनांत वावरूं लागलीं... त्यांनी कांचनपंतांच्याकडे डोळे वळवले.

त्यावेळची ती नानांचो नजर कांचनपंतांना विलक्षण वाटली. तोंवर अशी नजर कुठल्याहि पुरुषाच्या डोळयांत त्यांनीं पाहिलेली नव्हती.

नाना म्हणाले, 'ललितागौरीबद्दल तुम्हीं सारें सारें सांगितले पण ऽऽ पण हा दुरावा जाण्याची संधी केव्हां येणार ?'

'नाना, तिचा वाप घाशीराम नशीव काढायला आला आहे...म्हणून तर मघाशीं विचारलें. सगळें दप्तरच तुमच्यापाशीं आहे...'

'तें केव्हांच ध्यानांत आलें आहे माझ्या. कांचनपंत, या नानाच्या अस्तित्वाचा हाच अेक अेवढा कमकुवत भाग आहे. सोडूं म्हटल्या तो सुटत नाही. वऱ्याचदां सगळें सगळें आयुष्य अगदीं स्त्रीमय वाटतें, या सगळया चराचरीं जगण्याला स्त्रीचाच सुवास येतो, नाना हुंगून कसा धुंद होतो... वाळपणांतच या नानाला स्त्री कळली.. आणि आणि कांचनपंत तेव्हांपासून हा नाना

नाना पुन्हां थांवले. पुन्हां त्यांचं लक्ष झुंबराकडे गेलं. स्वतःच्या त्यांतल्या असंख्य रूपांच्याकडे वघून त हंसले. त्या हंसण्यांतला तिरस्कार त्यांना लपवतां आला नाहीं... तरी स्वतःबद्दलचा तिरस्कार त्यांनी लागलीच झटकून टाकला. कोंवडा अंग झाडतो तसं त्यांनीं मन झाडलं.

अुफाळल्या शब्दांनीं नाना म्हणाले,'कांचनपंत ललितागौरीला दाखवण्याचा वायदा तुम्हीं अजून पुरा केला नाहीं.'

'नाना नाना, जरा दमानें घ्या. धीर हा राजकारणांतच ठेवायचा असतो असें नाही...'

'या नानाला धीराची संथा देण्याच्या भरीस पडूं नका. धीर कोठें धरायचा अणि अधीर कोठें व्हायचें हे नानाला चांगलें कळतें. तुम्हीं येथेंच थांबा. मी जरा आंतून येतों.'

नाना आंतल्या दालनांत गेले.

हा नाजुक वायदा तेवढ्याच नाजुकपणानं पुरा करायला हवा होता... कळीचं फूल केव्हां होतं हें जरी कळत नसलं तरी फळ वरायला योग्य समय लागतो असं कांहींसं कांचनपंतांच्या मनांत आलं.

झुंवराकडे पहात पहात कांचनपंतांनीं वराच वेळ वाट पाहिली. जांभअीसुद्धां दिली.

अखेरीस अेक पोक्या म्हातारा काठी टेकीत टेकीत आंतुन आला. झटकन कांचनपंतांनीं त्याला विचारलं, 'काका काका, नाना आंत आहेत काय ?'

म्हातारा म्हणाला, 'नाना होय ? पहातो वरें. या नानांना हल्लीं शुद्धभान नाहीं.' आणि म्हताऱ्यानं नानांना साद घातली, 'नाना, अहो हे कांचनपंत वोलवत" आहेत. आणि हंसून म्हातारा पुढं म्हणाला 'चला कांचनपंत, आपणच जाअूं. हे नाना कांहीं लवकर निघायचे नाहीत.'

'पण कोठें गोंधळून कांचनपंतांनी विचारलं.

'कोठे ? अहो, ललितागौरीच्या दर्शनाला'

म्हाताऱ्याच्या त्या शब्दांनीं कांचनपंतांच्या डोक्यांत स्वप्न अुजाडलं. त्यांचे डोळे नवलाचे नक्षत्र झाले. ते अुद्गारले, 'नाना तुम्ही ?'

'होय आम्हींच. वेषांतर हासुद्धां राजनीतीचाच भाग आहे. नेहमीं जवळ ठेवावा लागतो. कधीं कधीं असाहि त्याचा अुपयोग होतो. आतां शब्दाशब्दी नको. चला. तुम्हीं पुढें आम्हीं मागून.' नाना म्हणाले.

आणि त्यावेळेलाच कांचनपंतांना वाहेर पडावं लागलं. कांचनपंतांनीं घाशीरामाच्या घराकडे पाय वळवले. नानांनी मागुन अम्मल पोक्यासारखीं पावलं टाकलीं.

'जयजय कांचनपंत जयजय' त्या नमस्कारानं कांचनपंत दचकल्यासारखे झाले. रस्ता सावध झाला.

कांचनपंतांनीं पाहिलं मात्र. कांचनपंत म्हणाले, 'ववा, ववा, कोठे निघाली स्वारी ?'

'अहो आमची स्वारी कसली. स्वारी नशीववंतांची.'

'आज नाहीं अुद्यां व्हाल.'

'कुंडली सांगते खरी... श्रीमंतांच्यापर्यंत जायचा विचार आहे. कोतवाली लाभली तर सोन्याहून पिवळें.'

संस्कृति संरक्षण



अनुक्रमणिका

"थोडें पुढें थोडें मागें असें सगळें केलें म्हणजे वाटेल तें मिळेल.'

"हं हं, हं हं कुंडली म्हणते मुलीमुळेंच माझा भाग्योदय होणार आहे. तुम्हीऽऽ नानांना भेटणार होतां त्याचें काय ?'

'ती चिंता नको तुम्हांला. अेवढा मोठा सूर्य. तोहि अुगवायला रात्र घेतो हें जाणा. चला तुम्हीं. शुभास्ते'

'हं हं, हं हं'

ती असामी गेल्यावर सूचक नजरेनं कांचनपंतांनीं नानांच्याकडे पाहिलं. सारखे सुरखे पोकत नाना म्हणाले, 'ओळखलें मी कांचनपंत. माझी तहान घाशीरामाची नाहीं, ललितागौरीची आहे. तुम्हीं पाय अुचला.'

## अंक तिसरा

चंद्रापासून सूर्यापर्यंतचा आनंद चेहऱ्यावर घेऊन नाना कचेरीला गेले. त्या दिवशीं त्यांनीं पालखीला अेक झूल अधिक लावली. कोतवालीच्या दप्तराला त्यांनी जरासुद्धां अंतर दिलं नाहीं. त्यांतली प्रत्येक ओळ नि ओळ त्यांनीं साऱ्या बुद्धिबळानं तपासली होती.

कचेरीला आल्याबरोबर श्रीमंत पेशव्यांनीं नानांना बोलवुन घेतलं. नाना खुषीनं बिंगवाळी चांचपीत श्रीमंतांच्या पुढं गेले. त्यांनी श्रीमंतांना मुजरा केला. नानांच्या चित्तांत सप्तरंगी तेरड्यांचं वन फुललं होतं लपंडाव खेळत ललितागौरी त्यांना खुणावीत होती.

'श्रीमंतांनीं आज्ञा करावी' नाना अदबीनं म्हणाले.

'नाना, अखेरीस त्या कोतवालीच्या पदाचें काय झालें ? आपण त्या दप्तराचा अभ्यास केला काय ?' श्रीमंतांनी विचारलं.

'होय हुजूर, केला.'

'मग आपला विचार काय ?'

नानांनीं अुत्तर द्यायला तोंड अुघडलं पण श्रीमंतच पुन्हां कांहीं म्हणत आहेत हें ध्यानांत येऊन नानांनी स्वतःचं तोंड मिटलं.

श्रीमंत म्हणाले, 'नाना, हें कोतवालीचें पद मोठें महत्वाचें आहे. शहर पुण्याची वाढ अटळ असल्यामुळें येथें जबाबदार अंमलदाराची जरुरी भासते. आणि त्यांत ऽऽऽ'

'त्यांत काय श्रीमंत ?'

'त्यांत खुद्द पेशव्यांची वसती येथें आहे म्हणून अशा अंमलदाराच्या विश्वासावर अधिक मदार ...'

'श्रीमंतांचें सर्व बोलणें माझ्या ध्यानांत आलें. काय, माझा तरी विचार श्रीमंतांच्याहून वेगळा आहे थोडाच ?'

'असें आमच्या कालत्रयींहि मनांत येणार नाहीं नाना,' आणि पुढं हंसून श्रीमंतांनीं सांगितलं, 'नानांच्या बुद्धीला नाना कळा म्हणून तर आम्ही हें कोतवालीचें दप्तर नानांच्याकडे दिलें.'

नाना मोकळं मोकळं हंसले त्यावर. तरी श्रीमंतांचे पुढचे अुद्गार अैकण्यासाठीं त्यांनीं कान टवकारले.

श्रीमंत म्हणाले, 'नानांच्या सल्ल्यावर आमचा पुरा भरंवसा आहे.'

'सारी श्रीमंतांची मर्जी. धन्याची उत्कृष्ट सेवा करणें अेवढेंच या सेवकाला माहित आहे.' श्रीमंतांना पोटांत घेण्यासाठीं नानांनी शब्दांतून मध पिळायला सुरुवात केली.

'नाना, तुमची बोलण्याची धाटणीच कांहीं वेगळी. तुमच्या शब्दानें व कृतीनें तुम्ही नेहमी शनवार वाड्याचा गौरव जपता हें कां आम्हांला माहीत नाहीं ? म्हणून तर आम्हीं म्हणतो कीं याहि महत्वाच्या समयीं आपला सल्ला अचूक असणार.'

'श्रीमंत, निदान माझा प्रयत्न तरी तसा आहे. ही कोतवाली शहर पुण्यास्तव अेक आवश्यक बाब झाली आहे.'

'हूं. आणि यास्तव असामीसुद्धां मातबर हवी.'

'बरोबर. लुंग्यासुंग्याचें हें कामच नाहीं. या पदावर अेखादा चोपदार नेमून केव्हांहि भागणार नाही. देहाची शक्ति व मनाचा विचार यांचा संगम झालेलीच असामी हवी. त्या असामीच्या स्वरास्वरांत दरारा हवा आणि पायांत भरारी हवी.'

'नाना, अशी गुणमंडित असामी तुमच्या आढळांत आहे काय ?

श्रीमंतांच्या प्रश्नावर नाना थांबले.श्रीमंतांच्या बोलण्याची पद्धत नानांना कांहीं नवखी नव्हती. नकळतच नानांची नजर तक्तपोशीवर कोरलेल्या कमळाकडे गेली... ललितागौरीचा सुरंगी चेहरा अुमलला... नानांचं मन दरवळलं

तक्तपोशीवरच्या कमळाकडे गेलेली नजर ओळखून श्रीमंतांनीं हंसतच अचानकपणें नानांना विचारलं, 'नाना, आज तुमचे डोळे अेखाद्या कविरायाप्रमाणें दिसत आहेत.'

अेवढे मोठे धोरणी नाना, पण तेहि त्या वाक्यानं बावरले. ओठ फसवे असले तरी डोळे प्रामाणिक असतात हेंच खरं. त्या बोरणी नानांनीं स्वतःला क्षणांत सावरलं. नाना म्हणाले, 'या जिण्यांत माणसानें रसिकपणा व अस्सल खुषी कधीं विसरूं नये. इतके दिवस मी तें कमळ बघत होतो पण श्रीमंत, आज मला तें वेगळेंच वाटलें. रसिकपणाच्या ओलाव्यांत मला आकळलें कीं श्रीमंतांनी असामी शोधलेलीच असेल, पण ऽऽ'

• 'पण काय नाना ?'

'पण आम्हांलाहि विचारून पहावें असा बेत असावा श्रीमंतांचा. श्रीमंतांच्या आज्ञेबाहेर या नानाला अर्थ तो कसला ?' श्रीमंतांना पक्कें कह्यांत घेण्यासाठीं नानांनीं व्यूह रचला.

'तसें नाहीं नाना. आम्हांला त्या पदावर कोणालाहि नेमावयाचे नाहीं. आम्हीं तरी तुमच्या सल्ल्याबाहेर का आहों ? कोतवालीसाठीं तुम्ही असामी सुचवावी व त्या असामीचा आम्हीं स्वीकार करावा हेंच श्रेयस्कर.'

'तर मग श्रीमंतांनीं या अर्जाचा विचार करावा. अेका लायक असामीचा हा अर्ज आहे. अैका श्रीमंत, मी स्वतःच वाचून दाखवतो.'

'वाचा वाचा.' श्रीमंतांनी आज्ञा केली.

आणि नानांनी तो अर्ज वाचून दाखवला.

वाचतां वाचतां श्रीमंतांच्या चेहऱ्यावरचे बदल टिपायला नाना विसरले नाहीत.

नानांनीं सावकाश पण जोर देऊन अर्जावरची मुद्रा वाचली...

ती अैकतांच झटकन श्रीमंत म्हणाले, 'कोण घाशीराम ?'

'होय घाशीराम'

'ही असामी मागे वाड्यावर आली होती. पण कामाच्या ताणामुळे आम्ही भेट देऊं शकलों नाहीं.'

त्यावर नाना मंद हंसले.

'नाना, तुमच्या निवडीवर आमचा पूर्ण भरंवसा आहे. अधिक बोलणें हवेंच कशाला ? या नेमणुकीबाबत पेशव्यांचें आज्ञापत्र काढा.'

श्रीमंतांचे शब्द अैकतां अैकतां तक्तपोशीवरच्या कमळाकडे नानांचं पुन्हां लक्ष गेलं... नानांच्या मनानं ललितागौरीच्या सोळा शृंगारांची किमया अनुभवली... पेशव्यांच्या आज्ञेनं त्यांच्या मनांत गुलाल अुधळला पुनवेचं चांदणं चाळ झुणझुणवून लयभरं नाचलं... सात समुद्रांतले ते अेकच अेक मोती झाले...

नाना म्हणाले., 'होय हुजूर.'

'घाशीरामना अुद्यांपासूनच चाकरीवर रुजूं व्हायला सांगा.'

'होय हुजूर.'

संध्याकाळीं मोठ्या दिमाखांत नाना वाड्यावर परतले. कांचनपंत त्यांची वाटच बघत होते.

घाअीघाअीनं कांचनपंतांनीं नानांना सांगितलं, 'नाना नाना, साऱ्या पुण्यांत घाशीरामाची कोतवालीच्या पदावरली नेमणूक सगळ्या तोंडीं झाली आहे... आणिऽऽऽ' आपलं तोंड नानांच्या कानांजवळ नेअुन कांचनपंत अगदीं खाजगी आवाजांत म्हणाले, 'किनखापी पड्द्यांचा मेणा संकेतस्थळीं रवाना झाला आहे... चलतां ना ?'

नाना ओठांत हंसले पण त्यांना डोळ्यांत स्वतःची लाज वाटली. ●●●






अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास







# एक प्रेमकथा

--वसंत केणे

"साव, वाहर कोई लडका आया है।" चपराशानं चेंबरच्या आंत येऊन सांगितलं.

तें ऐकून शंतनूला चिडचिडल्यासारखं झालं. ही वेळ कुणीं येण्याची का होती ?

तो नुकताच वॉश घेऊन आला होता. घरीं जायच्या तयारीनं. नि आरशासमोर राहून कपडे ठाकठीक करीत होता. त्यावेळीं कुणी यायला नको होतं; नि कुणी जायला नको होतं. तशांतून तसाच कुणी असता तर गोष्ट वेगळी.

पण हा कोई लडका आला होता. तें ऐकूनच शंतनूच्या चेहऱ्यावर तिरस्कार दाटल्याप्रमाणें झाला. टायची गांठ डाव्या चिमटींत पकडून एक पट्टा उजव्या हातांत धरून तो आरशासमोर होता त्याच स्थितींत त्यानें आपली दृष्टी चपराशाकडे वळवली. स्वरांत भरपूर नाराजी आणीत त्यानें विचारलं,

"क्या मंगता है असको ?"

"मिलनेको मंगता आपको."



"कल आनेको वोलो." कपाळावरील आंठ्या झटकल्यागत त्यानें मान आरशाकडे वळवली. नि टाय् नीट करावयास सुरवात केली.

मूर्ख असतात लेकाचे. भेटायलाहि कधीं यावं तें समजत नाहीं. छे: ! हे लोक नाहीं कधी सुधारायचे. साधा शिष्टाचार सुद्धां नाहीं.

लोकांच्या मूर्खपणाचे विचार मनांत आले म्हणजे शंतनूला नेहमींच वरं वाटतं – एका फर्मच्या मॅनेजरला वाटायला पाहिजे तसं.

तो चेंबरच्या वाहेर आला. चपराशानं त्याला सलाम केला. पद्धतशीर. तो त्यानें म्हटल्यास स्वीकारला म्हटल्यास नाहीं.

शंतनू पोर्चच्या पायऱ्या उतरत होता, इतक्यांत "मला आपल्याला भेटायचं होतं" असा आवाज आला. आवाजामागून सतरा अठरा वर्षांचा मुलगा जणुं कोपऱ्यांत उगवला. शंतनूनं त्याच्याकडे पाहिलं.

अंगांत धुवट लेंगा नि शर्ट. डोक्यावर टोपी. नि हातांत पिशवी.

शंतनूच्या कपाळावर आंठ्या पडल्या. असा वावळटपणा नजरेस पडल्यावर त्या आपोआपच पडतात.

तो मुलगा पुनः एकदोन पावलं पुढं सरला. पुनः अशिष्ट सलगी. "मी वाळ जोशी–आपल्याला भेटायला आलों होतों." पोरगा चुणचुणीत असावा. पण असे चुणचुणीत खूप असतात. त्यांत विशेष काय ?

"असं, असं ! वाळासाहेव, आपण उद्यां भेटूं शकतां !"

शंतनूला वाटलं आपण फारच उपरोधिक वोललों. तें त्याला फार चांगलं जमतं. त्याचा तसा समज होता. फर्मच्या मॅनेजरचा तसा समज असतोच.

"मी नोकरीसाठीं आलोंय्. एस्. एस्. सी. ची परीक्षा दिलीय्. सत्तर टक्के मार्क पडतील."

कारकडे जाणाऱ्या शंतनूच्या पाठीपाठीं जात तो वोलत होता. हा मात्र कहर होता. संतापजनक प्रकार होता. जणुं हा एस्. एस्.

*म्हणजे ती येणार....प्रौढ यौवनाचं प्रमत्त भांडार....तें येणार आहे. येणार आहे नि त्याच्या मिठींत गवसणार आहे. क्षेत्रांत हें चालतंच. त्यानं खूप ऐकलं होतं. वाचलंहि होतं. अशाच एका क्षेत्रस्थानांतली....*

---

सी. ला वसतो म्हणजे उपकार होता– शंतनूवर नि फर्मवर. फ़डतूस लेकाचे. साधा शिष्टाचार नाहीं. तिऱ्हाईत म्हणून इतका वेळ गय केली. शंतनू मागें वळला. तो मुलगाहि थांवला. पण त्याचं तोंड नाहीं.

"आपल्या दादरच्या पत्त्यावर गेलों होतों. तेथें समजलं कीं तुम्ही ती जागा सोडली. तुमच्या नव्या बिऱ्हाडाचा पत्ता समजला नाहीं—"

"हं, दुसरीकडे फ्लॅट आहे माझा." बिऱ्हाड हा शब्द शंतनूला खपला नाहीं. खपणं शक्यच नव्हतं. फ्लॅटला बिऱ्हाड म्हणणं म्हणजे काय ? तें न खपल्यामुळें शंतनू नकळत बोलला. नाहींतर अशा गोष्टी या पोराकडे का करायच्या ? लेंगा, शर्ट नी गांधी टोपी घालणाऱ्याकडे...बावळट !...

पण तें बावळट बोलतच राहिलं.

"दादरला तुमच्या जुन्या शेजाऱ्यांनीं तुमच्या ऑफिसचा पत्ता सांगितला. मग इथं आलों. शोधण्यांतच खूप वेळ गेला. दोन तीन तास भटकण्यांत गेले. म्हणून उशीर झाला !"

त्याचा चेहरा अपराधी झाला. क्षणभर बोलायचें थांवला. शंतनूकडे पहायला लागला.

ही मात्र आफतच खरी. याला ऑफिस सांपडलं नाहीं. म्हणून हा आतां आपला खोळंबा करणार. पोरगं सालं न भितां बोलतं.

"पण म्हटलं काय करणार ? नोकरी पाहिजे तर त्रास सोसलाच पाहिजे !" तो तर स्वच्छ घरगुती स्वरांत बोलूं लागला.

आतां आहे का नाहीं विनोद ! शंतनूलाच तो तत्त्वज्ञान सांगूं लागला. शंतनूला वाटलं कांहींतरी बोंचकारणारा विनोद करून त्याला पिटाळावं. म्हणावं, "बाळासाहेब जोशी, सध्यां कांही जागा खाली नाहीं. पण तुम्ही इतका त्रास घेतला आहे तेव्हां माझी जागा खाली करून तीच तुम्हांला द्यायला हवी. कंपनीचाहि त्यामुळें फायदा होईल !"

परंतु शंतनूला बोलूं द्यायचा नाहीं असा त्यानें जणूं निर्धारच केला होता.

"आपल्याकडेच असली नोकरी तर बरं होईल. नसली तर आपल्या ओळखीनं दुसरीकडे कोठेंहि. पण मला नोकरी पाहिजे. तावडतोब पाहिजे."

"दुसरीकडे कशाला आमच्याच कंपनींत देऊं कीं—" मघां ठरवलेलं शंतनू पुढं बोलणार होता. पण तेवढ्यानेंच बाळासाहेब फुलले !

"आई म्हणालीच होती तुम्ही नक्की नोकरी द्याल म्हणून—"

याची आई ! ती म्हणाली. हा कुणी दूरचा नातेवाईक तर नव्हे ! नोकरीसाठीं, वशिल्यासाठीं, खूपशीं नातीं त्याला चिकटलीं होतीं. पण त्याचा विनोद जिरला.

"कुठचा तूं ?"

"हो, विसरलोंच मी सांगायला. मी वाईहून आलोंय्. आईनं चिठ्ठी दिलीय्. आपल्यासाठीं." त्यानें पिशवींत हात घातला. एकदोन कपड्याचे बोळे काढले. ते काखेंत धरले नि तळांतील एका लिफाफ्यांतून एक चिठ्ठी काढली. अनंत घड्या पडलेली.

नाही म्हटलं तरी शंतनूचं कुतूहल जागं झालं होतं.

त्यानें ती चिठ्ठीची पुरचुंडी उलगडली.

ती लिहिली होती पेन्सिलनें !

शंतनूच्या कपाळावर आंठ्या पडल्या. साहजिकच आहे. पेन्सिलनें चिठ्ठी म्हणजे काय ? बावळटपणा नुसता. त्याची नजर मजकूर वाचूं लागली.

'स. न. वी. वी.....'

आतां मात्र त्यानें कपाळाला आंठ्या घालून त्या मुलाकडे पाहिलं.

त्यानेंहि शंतनूचा चेहरा वाचला. आपणहून तो म्हणाला, "आई फारच थोडी शिकलीय्. खूप अशुद्धं आहेत चिठ्ठींत. मी तिला म्हटलं तसं. पण ती म्हणाली, 'मी लिहिण्यांत चुकलें तरी वागण्यांत चुकत नाहीं.' पण खरं म्हणजे—"



**चिट्ठी**

**चिठ्ठीच्या कागदा । तीन वर्णभेद**
**गुलाबी सफेद । निळा असे**
**'नोकरी द्या यास' । 'चालेल दिल्यास'**
**'हाकला आल्यास' । रंग बोले.**

**–'आंद्री'**

---

परंतु शंतनू चिठ्ठी वाचण्यांत गढला होता.

"म्हणजे तूं वाईच्या बबनरावांचा म्हणजे आमच्या गुरुजींचा नातू !" तो आश्चर्यानं म्हणाला. पण तें किंचित्मात्रच दाखवलं त्यानं. कुणापुढं कोणत्या बाबतींत किती आश्चर्य दाखवायचं असतं याचंहि शास्त्र असतं. शंतनूच्या तें परिचयाचं होतं. त्याच्या दर्जाच्या माणसाला तें हवंच असतं. "मग आधींच कां नाहीं सांगितलंस ?" शंतनूच्या स्वरांत मवाळपणा शिरला. त्याच्याहि नकळत.

"नि उतरलास कुठं तूं बाळ ?"

"अजून कुठंच नाहीं. आजच आलों. आई म्हणाली— आई म्हणाली, उतरायचं आपल्याकडेच !"

"अर्थात् म्हणूनच विचारलं." हा नित्याचाच प्रकार. स्वतःला सांवरून घेण्याचा. "मी मागें तुमच्याकडेच नव्हतों का उतरलों तीनेक वर्षं झालीं त्याला. तीन वर्षांत खूपच मोठा झालास तूं. मी ओळखलंच नाहीं ! चल." शंतनूनें कारचं मागील दार उघडून त्याला आंत शिरण्याची सूचना केली.

बाळ आंत शिरला. अंग चोरून बसला. पिशवी आपल्या पायावर घेतली. शंतनूला हंसू आलं मनांत. "पिशवी बाजूला ठेव कीं !' त्यानं चाक हातांत धरीत म्हटलं. नि गाडी सुरू केली.

गाडी मार्ग क्रमूं लागली. सराईतपणें. सफाईनें. नेहमीच्या संवयीनें. गर्दीतून वाट काढ, रस्ता रोखला कीं थांब, परत गति घे, जणूं नेहमींच्या संवयीनेंच ती धांवत होती. ●



अनुक्रमणिका

वाईच्या मोटार-अड्ड्यावर तो पोंचला तेव्हां दुपार तशी कललीच होती. हवेंतला उष्मा मात्र कमी झाला नव्हता. प्रवासाच्या त्रासानें त्याला तो अधिकच वाटत होता.

हमालाची सोबत घेऊन तो ववनराव जोशींच्या घराकडे चालला. रस्ता तुडवीत जाणं वैताग होता. शहर निखळ जुनाट. त्यांत अडाणीपणा कोंडलेला. नेटकेपणा, व्यवस्थित-पणा, अटोपशीरपणा, स्वच्छपणा कशाचा तेथें पत्ता नव्हता. मोटारींची रहदारी नाहीं; आकर्षक दुकानं नाहींत, कलकारखान्यांचा आवाज नाहीं. अडाणीपणा नुसता. पांढरपेशा वाटणारे स्त्री–पुरुष– वेंगरूळ वाटत सारे. मळकट कपडे, वाढलेल्या दाढया नि बुभुक्षित डोळे ! या लोकांत सुधारणा होणं–खरंच कठीण. आधुनिकतेचा हात या गांवावरून फिरलाच नव्हता. गांवांत कांहीं चैतन्यच नव्हतं. सळसळ नव्हती. जीवंतपणा नव्हता. होता केवळ जुनाटपणा, बुरसटलेपणा, कळाहीनपणा !

तो मुक्कामाला पोचला. वाड्यावर हीं मोठी पाटी रंगवलेली. ववनराव मोरेश्वर जोशी, प्रमुख तीर्थोपाध्ये ! तीहि जुनाट. वेढव नि कळाहीन.

"या, या या या ! शंतनूराव, याऽऽऽ" ववनरावांनीं अंदाजानें ओळखून त्याचं स्वागत केलं. बसल्या जागेवरून उठत. दोन पावलं पुढं येत. अगत्यपूर्वक पण मोठ्या आवाजांत. अशिष्ट मोठ्या आवाजांत. मर्यादेहून अधिक सलगी दाखवीत.

शंतनू आंत शिरला. अवघडलेपणानें हंसत. "नमस्कार गुरुजी." तो हात जोडून म्हणाला. पद्धतशीरपणें.

"आनंद झाला आपल्याला होऽऽऽ!" गुरुजी म्हणाले,

"पत्र मिळालं कालच. अगत्यपूर्वक असलात. हो ऽऽ ऽ, इतकं अगत्य हल्लीं क्वचितच आढळतं !"

"वडिलांची इच्छाच होती—" कांहींतरी बोलायचें म्हणून शंतनू म्हणाला.

"रास्त आहे. रास्त आहे, हो ऽऽऽ! हा श्रद्धेचा प्रश्न आहे. एका बाजूला श्रद्धा नि दुसऱ्या बाजूला जगांतलं सारं ज्ञान-विज्ञान— तरी जड होईल श्रद्धेचं पारडं जड. होईल हो ऽऽऽऽ!"

बोलत बोलत त्यांनीं शंतनूला वाड्याच्या आंतल्या अंगाला नेलं. चौकांतील पायरीवर हातपाय धुवायला पाणी दिलं.

"वंऽऽर ! आतां शंतनुराव, तुम्हीं जेवून घ्या—"

"आतां नको जेवण गुरुजी — इतक्या अवेळीं–"

"छे ! छे ! छे ! छे ! अजिबात संकोच करायचा नाहीं होऽऽऽ शंतनुराव. हें घर आपलंच आहे. परकेपणाची भावनाच नको होऽऽऽ ! हक्कानें सांगायचं. होऽऽऽ तुमचा हक्कच आहे. शंतनुराव ! तुमच्या सारख्यांच्या वाडवडलांच्या कृपेनं ही वास्तु उभी राहिली, तिथें परकेपणा कशाला ? होऽऽऽ आतां जेवा, विश्रांति घ्या घटकाभर. वरं वाटेल. प्रवासाचा शीण जाईल होऽऽऽ! जेवणाची सारी तयारी आहेच !"

म्हातारा सारखं होऽऽऽ, होऽऽऽ, करून बोलत होता. पण त्या बोलण्यांत जादू होती. अवघडलेपणा घालविणारी. विरोध विरवणारी.

म्हातारा गोष्टीवेल्हाळ खूप. शंतनूला बहुतेक ऐकायचं काम. त्यांचा एकुलता एक मुलगा म्हणे पांचेक वर्षामागें देवाघरीं गेला. मागें म्हणे विधवा पत्नी नि लहान मुलगा. तो नातूच आता वंशाचं फूल. त्यांच्याच्यानं म्हणे आतां पूर्वीसारखं काम होत नसे. त्यांच्यात म्हणे भाऊबंदकीहि होती. त्यांच्या परिस्थितीचा ते फायदा घेत. त्यांच्या हक्काच्या यात्रस्थांना आपल्याकडे नेत. कुणी शंतनुरावासारखे यात्रस्थ अगत्यानं येत. त्यांचीच तेवढीं कार्यं ते करीत. त्यांचं वय झालेलं. त्यामुळें म्हणे त्यांना यात्रस्थ गांठायला, काम मिळवायला जमत नसे. कुणी कांहीं कामबिम दिलं तर बरं नाहीं तर म्हणे दिवस तसाच रिता काढायचा. आजकाल म्हणे पूर्वीसारखे लोक धार्मिक कर्मकांडाला महत्त्व देत नाहींत.

त्यांची सून म्हणे त्यांना मुलाच्या जागीं होती. घरांतलं बाहेरचं तीच पाही. तिच्या-मुळेंच घरगाडा म्हणे चालला होता. नातू एकदां एस्. एस्. सी. झाला नि कुठेंतरी नोकरीला लागला म्हणजे त्या माऊलीच्या कष्टांचं सार्थक होईल. त्यांचा नातू म्हणे हुशार होता. हायस्कूलमध्यें होता. एस्. एस्. सी. चांगला पास होण्यासारखा होता. फक्त म्हणे दैवानें वाकडी नजर नाहीं केली म्हणजे पुरे.

गुरुजींचं बोलणं चालूं असतांना पान मांडल्याचा निरोप आला. शंतनूला घेऊन ते स्वयंपाकघरांत गेले.

## महत्त्वाची सूचना-

**लेखकांसाठीं :** बऱ्याच लेखकांचें "दीपावली" कडे आलेलें व नापसंत ठरलेलें साहित्य आमच्याकडे कांहीं महिने पडून आहे. तें परत हवें असेल तर त्या लिखाणाचें पुरेसें पोस्टेज लेखकांनीं त्वरित पाठवावें म्हणजे तें त्यांच्या पत्यावर रवाना करतां येईल. दि. ३० जून १९६४ पर्यंत. पोस्टेज पाठविणाऱ्यांसच असें साहित्य परत करण्यांत येईल. अन्यथा तें तावडतोब निकालांत काढलें जाईल व त्यासंबंधीं पुनः कसलाहि पत्रव्यवहार केला जाणार नाहीं. नापसंत कविता परत पाठविल्या जात नाहींत याचीहि कृपया नोंद घ्यावी.

—संपादक

**वर्गणीदारांसाठीं :** ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.

— व्यवस्थापक.



अनुक्रमणिका




नव्या फॉर्म्युलाचा

# सनलाइट

## अधिक चमकदार धुलाईसाठीं

नव्या फॉर्म्युलाच्या सनलाइटचें वेष्टन नवें आधुनिक असून त्याचा आकारहि नवा आकर्षक आहे. विशेष म्हणजे त्याची अधिक चमकदार धुलाईची शक्ति. या त्याच्या शक्तीमुळें प्रत्येक धुलाईला कपडे अधिक चमकदार धुवून निघतात...

धुलाई अधिक शुभ्र, अधिक चमकदार होते !

हिंदुस्तान लीव्हरचें उत्पादन

S. 56-140 MA










"होऽऽऽ! या आमच्या सूनबाई वरं. तुम्हांला सांगितलंच हिच्यामुळं चाललंय् सारं. घराला खरा आधार तिचा. मी आपला म्हातारा माणूस. होऽऽऽ!"

शंतनूनं तिच्याकडे पाहिलं. तीहि त्याच्याकडे पाहत होती. तिनं दृष्टि वळवली.

शंतनू मात्र क्षणभर दिपल्यासारखा झाला. तिच्या प्रौढ सौंदर्याच्या ठसठशीतपणामुळें. चेहऱ्यावरील रसरशीत तजेल्यामुळें. सुडौल बांध्यामुळें.

तिच्या कपाळावर कुंकूं नव्हतं. अंगावर अहेवलेणीं नव्हतीं. तरुण हिंदु स्त्रीच्या वावतींत ही उणीव डोळयांत भरते. पण शंतनूला वाटलं, ही उणीव हिच्या वावतींत लक्षांत येत नाहीं. लक्षांत येतो तिचा सतेज रसरशीतपणा. मनांत भरतो तिचा सुडौल पुष्टपणा.

शंतनू जेवत होता – बाजूला पाटावर वसून गुरुजी बोलत होते. आग्रह करीत होते.

"घरच्या सारखं रहायचं. होऽऽऽ. हवं तें मागून घ्या. संकोच नको. तुम्ही संकोच केलांत तर आम्हाला वरं वाटणार नाहीं. तुम्हांला कांही कमी पडलं तर आम्हांला वरं वाटणार नाहीं. होऽऽऽ! सूनबाई वाढ त्यांना दोन चतकोर पोळी – अवेळीं झालं म्हणून काय झालं? होऽऽऽ, जेवण तर व्हायला पाहिजे!"

ती वाढायला येई तेव्हां शंतनू तिच्याकडे मुद्दाम पाही. एकदोन वेळां तिचीहि दृष्टि मिसळली. शंतनूच्या काळजांत लक् झालें.

ही कष्टानें पिचलेली वाटत नाहीं. वाटते सारं कांही भोगलेली! भोगलेली ? का भोगणारी? अजून भोगणारी तिच्या अवयवांचा सुडौल पुष्टपणा

डोक्यांत सैरभर होत असतांनाच तो आंचवावयास उठला.

वाहेर पान चघळतांना शंतनू वाड्याचं फिरून अवलोकन करूं लागला. वाडा जुनाट. मोडकळीस आलेला. ठिकठिकाणीं ढेपाळलेला. अस्ताव्यस्त, ओवडधोवड नि वेडावांकडा. तिथं आधुनिकतेचा वास नव्हता जणुं. सारं जुनाट जीर्ण. ववनरावांसारखं. त्यांच्या कळाहीन सुरकुतलेल्या नि दाढी वाढलेल्या चेहऱ्यासारखं!

ज्याच्याविषयीं आदर वाटावा असं कांहीं नाहीं. धार्मिक कार्यासाठीं म्हणून इथं यायचं. पण कसलं पावित्र्यच नव्हतं जाणवत. जणुं सारं अर्थहीन. जणुं कशाला प्रतिष्ठाच नव्हती. सारं कांहीं टाकावू. ही वास्तु, गांव, हें धार्मिक कर्मकांड

कांहीं वेळानं तो वाहेर पडला. फिरावयास म्हणून. गुरुजीहि त्याला म्हणाले, "या, या, जरा फेरफटका मारून, होऽऽऽ, इथं वरं वाटेल तुम्हांला. सारं शांत वाटेल. मोकळं वाटेल. होऽऽ, आमच्या कृष्णामाईचं दर्शन घेऊन या. गंगा आहे ती आमची."

तो फिरत फिरत नदीकांठीं आला. घाटावर. वारं गार होतं. पण त्याचे डोळे जणुं वखवखले होते. नदीवर धुणीं वडवणाऱ्या स्त्रिया. त्यांचे वर खोचलेले ओचे; शरीराची होणारी हालचाल. त्याचे डोळे वखवखल्या नजरेनं टिपत होते.

गांव अनोळखी. लोक अनोळखी. दृष्टीस पडणाऱ्या साऱ्या स्त्रिया म्हणजे माद्या वाटत होत्या. वखवखलेले डोळे माद्यांना हुडकीत होते. त्या दृष्टीस पडल्या म्हणजे टक लावून निरखीत होते.

नि मध्येंच गुरुजींची सून डोळ्यासमोर उभी राही. तिची रसरसलेली काया तिच्या चेहऱ्यावरील तकाकी. तिचा सुडौल पुष्टपणा... सारं कांहीं भोगलेला..नि नि भोगणारा.....

त्या शिवायच का ती अशी आहे? क्षेत्रांत असे प्रकार खूप चालतात. त्यानं बऱ्याच जणांकडून ऐकलं होतं. वाचलं होतं. म्हाताऱ्याचं बोलणं आपल्याला सूचना देत होतं का? कांहीं अनमान करूं नका. घर तुमचंच आहे. पाहिजे तें मागून घ्या. सूनबाईमुळें चाललंय् सारं.....' नि जेवतांना म्हणाला होता, "तुम्हांला कमी पडलं तर आम्हाला संतोष वाटणार नाहीं." यांतून तसंच कांहीं सुचवीत होता? तो सुचवीत होता का आपल्यालाच तसं वाटतं?

वहुधा सुचवीतच असेल. उदरभरणाची धडपड.....संधि साधावी का? काय हरकत आहे? कुणाला कळायला मार्ग नाहीं कीं समजायला. आणि तें पुष्ट नि प्रौढ सौंदर्य...तें आपणहून येत आहे पायाशीं. तें दूर करण्यांत अर्थ काय? निरंतर हळहळ करण्यांत मतलब काय?






अनुक्रमणिका

डोक्यांत भिरभिर चालूंच होती. दिवेलागणी झाली. तसा तो परतून वाड्यापाशीं आला. जुना मोडकळीला आलेला वाडा. वाड्यावर जुनाट पाटी. बबनराव मोरेश्वर जोशी – तीर्थोपाध्ये !

तीर्थोपाध्ये ! एवढी मोठी पाटी. नि आंत व्यभिचार.' जीवंत रहाण्यासाठी. जाऊं दे. संधि मिळाल्यास कां सोडावी ?... कां सोडावी ?

तो ओटीवर आला. सूनवाई आंतल्या दरवाजांत उभ्या होत्या. सासऱ्याशीं कांहीं बोलत. दिव्याच्या प्रकाशांत तिचा लावण्यमय चेहरा पाहून शंतनू दिपला. अक्षरशः क्षणैक तिथेंच खिळला. पण गुरुजींच्या "सांभाळून या, होऽऽ, पायऱ्या जरा बरोबर नाहीत." या वाक्यानें तो भानावर आला.

सूनबाई आंत गेल्या. गुरुजींनीं आपल्या गोष्टीवेल्हाळ गप्पांना सुरवात केली. त्याची सोय माडीवरील खोलींत केल्याचं सांगितलं.

त्याला म्हाताऱ्याच्या गप्पांत रस वाटत नव्हता. त्याची उत्सुकता मनोमन शिगेला जात होती. आपल्याला आलेला संशय खरा का ?

"मी मग वर जाऊन पडतों. मला भूक नाहींच. जेवण उशीरा झालंय्" – शंतनू म्हणाला.

"होऽऽ दमलां असाल प्रवासानं. पण रात्रीं थोडं पिठलं भात तरी खायचा होता."

"छे ! कांहींच नको. दुपारीच खूप झालंय्."

"बरं मग दूध थोडं तरी घ्याच–"

"नको, खरंच, गुरुजी ! दूध वगैरे कांहीं नको."

"तुम्हाला सांगितलं शंतनुराव ! घर तुमचंच आहे. तुम्हांला घरीं असं कुणीं झोपूं दिलं असतं काय ? तुम्हांला उणें पडलं तर आम्हांला बरं नाहीं वाटणार !" शंतनूचा संशय बळावूं लागला.

"बरं, इतक्यांत नको असेल तर, थोड्या वेळानं घ्या. सूनबाई ! थोड्या वेळानें यांना गरम दूध नेऊन द्या वर, बरं का !" सुनबाईंना उद्देशून त्यांनीं सांगितलं.

शंतनूच्या संशयाला जागा राहिली नव्हती.

(पृष्ठ ३० वर)



**–सिनिक्**

भल्या पहाटें मी गजाननाच्या घरीं गेलों. बऱ्याच दिवसानंतर माझें त्याच्या घरी जाणें झालें होतें. विजया त्याला सोडून गेली हें कारण होतें.

गजाननाचें घर नेहमीप्रमाणेच शांत होतें. निर्व्याज होतें. स्वच्छ बैठक त्याच्या अस्तित्वाबद्दल कमालीची नम्र होती. 'बसा ना' असें बायकी आवाजांत सांगणारें सध्या त्या वास्तूंत कुणी नव्हतें.— आणि गजानन अशा उपचारांच्या बाबतींत फारसा जागरूक नाही हें ओळखून कुणाच्या सांगण्याची वाट न पाहतां, हात नसलेल्या व भिंतीला लावून ठेवलेल्या एका खुर्चीवर मी बसलों. तिथें एक फरक चटकन् लक्षांत आला. भिंतीवर लावून ठेवलेला दोघांचा लग्नांतला फोटो नव्हता. त्यावरून विजया त्या घरांत परत येणार नाही असें अनुमान काढण्याचा मोह होत होता.

'केव्हां आलास ?' टॉवेलने डोकें पुसत गजाननानें विचारलें. त्याच्या बोलण्यांत किंवा चेहऱ्यावर चलबिचल मुळींच दिसली नाही. नेहमीचाच समबात भासणारा गजानन होता. वागण्यांत कृत्रिमता नाही आणि माणसांना आकर्षित करणारी आस्थाहि नाहीं. म्हणजे विजयाचें जाणें विरहाग्नि झालें नव्हतें. . . .

सदरा घालून माझ्या समोरच्या हात नसलेल्या एका खुर्चीवर गजानन बसला. केंस विंचरून झाल्यानें त्याच्या चेहऱ्याला चांगलीच तकाकी आली होती. अगदीं पंचवीस वर्षांच्या तरुणासारखा तो दिसत होता. सुदृढ व निरोगी होता. संपन्नहि होता. अशा माणसाचा संसार प्रपंच व्हायच्या अगोदर विजया कां सोडून गेली हें तर्कानें ताडणें अशक्य होतें.

गजानन स्वतःहून कांहीं सांगेल व आपल्या मित्रांना सविस्तर खुलासा करेल ही अपेक्षा करणें व्यर्थ होतें. कारण तो त्याचा स्वभाव नव्हता. त्याचा विजया बरोबरचा प्रेम-विवाह नव्हता हें खरें पण त्याचें विजयावर अतोनात प्रेम होतें. आपल्या सुरूप व गुणवान मुलीला सुखांत ठेवील ह्या जागरुकतेनें विजयाच्या वडिलांनी गजाननाची निवड केली होती याची जाण गजाननाला होती. विजयाच्या बाबतींत प्रत्येक गोष्टींत त्याला सोत्साह आस्था होती

त्यांचें कधीं बिनसेल आणि ते वेगळे होतील अशी कुणाला स्वप्नांत सुद्धा शंका आली नसती. कशांत खटका उडाल्याचें चुकून देखील कानावर आलें नाहीं . . . . . विवाहाच्या-अगोदर विजयाच्या कांहीं प्रेमकथा प्रसृत होत्या. पण गजाननाच्या खातीं त्या जमा नव्हत्या. जमा असल्या तरी त्यानें त्यांना कुठपत किंमत दिली असती याची शंकाच आहे . . . . .

गजाननाच्या बैठकीच्या खोलींत जरी त्या पतिपत्नींचा एकत्र काढलेला फोटो दिसत नव्हता तरी कांचेच्या कपाटांतलीं राजेराणी खेळणीं मात्र हललीं नव्हतीं. तीं केव्हां, कां आणि त्या दोघापैकीं कुणी पुढाकार घेऊन आणली हें कळणें दुरापास्त होतें. गजानन–विजया यांच्या सोळा वर्षांच्या वैवाहिक जीवनांत अपत्यसंभव झाला नव्हता. क्षणभर मनांत आलें कीं निरपत्य जीवनाचा उबग येऊन तर विजया गजाननाचा संसार त्यजून गेली नसेल ना ?

तसें मला शक्य वाटत नव्हतें. कारण गजाननापेक्षाहि जास्त विजयाला मी ओळखत होतों. तिला आपल्या सौंदर्याचा जेवढा अभिमान होता त्यापेक्षाहि जास्त गर्व तिच्या सौंदर्याला बुद्धिवैभवाचें अवगुंठन आहे याचा होता. स्वतंत्र विचाराची विजया कधीं कुटुम्बवत्सल स्त्री होईल असें मला कधींच वाटलें नव्हतें . . . . . स्त्रियांच्या बाबतींत मातृत्व हें पुरुषांनी लादलेलें असून त्याचा जन्म स्त्रीवरच्या अविश्वासांतून झालेला आहे असें ती

मला एका वर्षापूर्वीच म्हणाली होती. जोपर्यंत पुरुष स्त्रीवर पूर्ण विश्वास टाकत नाहीं तोपर्यंत त्यांचें सहजीवन अशक्य आहे असें ती तळमळून उद्गारली होती.....

मींच शेवटीं हिंमत करून गजाननास विचारलें. तो अविचल दिसला. त्यानें दोन-तीनदां चोतरास हात पुसला आणि तो म्हणाला 'माझी कांहींच तक्रार नाहीं. ती कां गेली हें अजूनहि मला उमगलेलें नाही. मी तिच्या मनाविरुद्ध कधीं गेलों नाही. असें असूनहि ती पूर्ण सुखी नव्हती. या शहरांतच तिनें वेगळें राहावें यापेक्षा कधीं भेट झाली तर केवळ एक ओळखीचा माणूस म्हणून ती स्मित करते आणि अंगावरून जाते याचें मला विचित्र वाटतें

म्हणजे विजया गांव सोडून गेली नव्हती. तिथेंच होती. गजाननापेक्षा ती माझ्याशीं अधिक बोलली असती

●●

मी विजयाच्या घराकडे निघालों. जातांना गेल्या वीस वर्षांचा तिचा–माझा परिचय पट मनश्चक्षूसमोरून सरकला. कित्येक प्रसंग आले गेले. भेटी झाल्या. मनमोकळें बोलणें झाले. हंसणें खिदळणें झालें. सलगीचें हितगुज झालें. परन्तु सार म्हणून कांहीं ठरले नाही. स्पर्श झाला होता पण त्याचा ठसाच उमटला नव्हता. हातांत कांहीच नव्हतें. डोळ्यांत आणि चित्तांत किती किती तिला साठवली होती. पण कधींच टिकली नाही. अगदी पाऱ्या-सारखी निसटली होती.

विजयाचें स्वतःचें बिऱ्हाड आकर्षक होतें. बैठकींत सोफासेटवर एक तरुण बसला होता. त्याला कुठेंतरी कांहीं दिवसापूर्वीं पाहिल्यासारखें वाटत होते. एक वर्षापूर्वी जेव्हां विजया भेटली तेव्हां तिच्या बरोबर होता. विजयाचे हे एक वैशिष्ट्य असावे. ती केव्हांच कुणाबरोबर आहे असें वाटायचें नाहीं. तिच्या बरोबर कुणीतरी आहे असें वाटावें. त्या वेळेसहि तो अगदीं जवळीक असल्यासारखा विजयाशीं बोलतो असें भासलें होतें अन् विजया जणूं त्याला अभय देऊन होती.....

विजयाने मला पाहतांच त्यानें आतां जावें असें माझ्याशीं बोलणें सुरूं केलें. 'पुन्हा येतो' असें जेव्हां तो म्हणाला तेव्हां विजया म्हणाली 'आज उद्या नको'. मला वाटलें कीं आता विजया कहाणीचा कुंभ रिता करणार.....ती म्हणालीहि 'बऱ्याच दिवसांनी आठ-वण झाली. आता जेवूनच जा....ही आलेंच आता ' आणि ती पाठमोरी झाली.....

विजयाच्या लांब व दाट केसांची नितंबावर घरंगळणारी वेणी अजून पावशतक तरी मीझें लावण्य हिरावलें जाणार नाही असें जणूं बजावत होती.....तिचा आकार सडपातळच राहिला होता. सावळी अंगकांति माघार घेण्याची भाषा मुळींच न बोलणाऱ्या यौवनानें उजळून निघाली होती. वीस वर्षांच्या ऊनपावसांनीं तिची काया आणखीन रूपसंपन्न केली होती.....अशी ही विजया ज्या गजाननाच्या घरांत समृद्धि, प्रतिष्ठा आणि स्थिरता होती तें सोडून कां आली ? तिला काय हवें होतें ?

जेवतांना विजयाला नानापरीनें मी छेडून पाहिलें. ती वेगवेगळ्या परीनें 'कंटाळा आला त्याच्यावरोबर संसार करण्याचा' हेंच आळवून सांगत होती आणि माझें कांहीं त्याने समाधान होत नव्हतें. कंटाळा येतो म्हणून कां कुणी संसार नवरा आणि स्थैर्य सोडून देतो ? चार मुलें झाल्यावरहि बायकोवरचें प्रेम टिकून राहतें असें गृहित धरणाऱ्या मजसारख्याच्या मनांत नाना विचारांचें काहूर माजलें. मला खरेंच कां तिचें म्हणणे कळत नव्हतें ? ती खरं तेंच सांगत होती कां ?

मी विचारलें, 'आणि असं एकटं राहून कंटाळा नाही कां येणार ?'

'एकटी कुठें आहे ? आई–बाबा मजबरोबर आहेत ना ?'

'त्यांना काय वाटत असेल ?'

'खरं सांगूं ? बाबा पेन्शनींत निघाल्यावर त्यांना प्रश्नच होता एकटं राहण्याचा. त्यांना वयांत आलेला मुलगा असता तर कदाचित् तेंवढाच आधार आणि दिलासा वाटला असता. म्हणून सध्याच्या माझ्या निर्णयाचं ते कौतुक कां करतात तें लक्षांत येईल. आईच्या बाबतींत तूं म्हणतोस तें खरं आहे. पण तिचा सिद्धिविनायकावरू विश्वास आहे. कधीं ना कधीं सारं ठीक होईल या श्रद्धेनं ती समा-धानानं जगत आहे. वस्तुनिष्ठ दृष्टीनं पाहिलंस तर या साऱ्या माणसांना कुठं कांहीं मूलभूत-रीत्या बिघडलं आहे असं मुळींच वाटत नाही. वास्तविक हीं सारीं सुखांत आहेत. आई प्रवचनाला जाते. मीं कामाला जाते. बाबा झोंप काढतात. वाचतात. फिरावयास जातात. संध्याकाळीं माझ्याशीं चर्चा करतात. मी जागरूक आहे, दुःखी नाहीं या विश्वासानें निश्चिंतपणें झोंपतात. दिवसामागून दिवस जातात. मी येथें येऊन सहा महिने झाले....

'पुढची मजल विजया खूप मोठी आहे...

'असेल.... सोळा वर्षं नाही कां काढलीं' या तिच्या उत्तरावर मी निरुत्तर झालों. अर्थात बोलणें अप्रिय पातळीवर मुळींच आलें नव्हतें. पण.....

निघतांना मला विजया म्हणाली 'मुलें ठीक आहेत ना ? आण ना त्यांना. आईला फार आवडतात ., वहिनी कशा आहेत ? त्यांनाहि आण '

आणि विजयानें माझ्या पत्नीस प्रथमच 'वहिनी' म्हणून संबोधल्याचें मला अतिशय खटकलें. त्यानें मी कमालीचा अस्वस्थ झालों. अजूनहि अस्वस्थ आहे ●●●

(पृष्ठ २९ वरून)

थोड्या वेळानं ती दूध घेऊन येणार. माडी-वरील खोलींत.

शंतनू माडीवर आला. तिथं कुणीच नव्हतं. त्याच्यापुरती जागा साफ केली होती. लाकडी पलंगावर त्याच्यासाठीं बिछाना तयार केला होता.

तो पलंगावर पहुडला. त्याचं मन स्वतःशींच हंसलं. त्याचा अंदाज खरा होता. 'तुम्हांला कांही कमी पडलं तर आम्हांला बरं वाटणार नाही.' म्हातारा मोठ्या सूचकपणें बोलला होता. सुनेला तर त्याच्या-समोरच तो बोलला होता, 'त्यांना वर दूध नेऊन दे !'

म्हणजे ती येणार. त्याचा अंदाज खरा ठरणार. तिचा ठसठशीत पणा कमनीय बांधा.. प्रौढ यौवनाचं प्रमत्त भांडार...तें येणार आहे. येणार आहे. नि त्याच्या मिठींत

गवसणार आहे. क्षेत्रांत हें चालतंच. त्यानं खूप ऐकलं होतं. वाचलंहि होतं.

पण आपण असं कांहीं करणं रास्त होईल? ती कशीहि असेल; पण आपण आपलं चारित्र्य डागाळून घ्यायचं?

शंतनूच्या डोक्यांत उलट सुलट विचार घोंघावत होते. भुंग्यासारखे. नि त्याखालीं होतं त्याच्या मनाचं फूल – तिची वाट पहाणारं! अधीरतेनें अपेक्षेनें!

इतक्यांत जिन्यांत पदरव झाला. तीच आली असेल का? का दुसरं कुणी येईल दूध घेऊन? नाहीं तीच येत असेल. सासऱ्यानें तिलाच सांगितलं आहे.

त्याच्या काळजांत लक् झालं. तो कानोसा घेऊं लागला. तो पदरव थांबला. कांहीं वेळ तसाच गेला. त्याची अधीरता विलक्षण वाढली. त्यानें हलकेंच उठून जिन्याशीं पाहिलें. तिथें कोणीच नव्हतें. त्याला झाला होता भास!

पुनः एकवार असाच प्रकार घडला. केवळ भास!

पुनः भुंगे घोंघावूं लागले. आपल्याला वाटतं तें खरं असेल का? ती स्वतः आली तर निश्चितच तसं समजावं. पण ती येईलच. त्याला खात्री वाटत होती, अन् ती आल्यावर ..... आल्यावर .....

त्याचीं बोटें उशींत घट्ट रुतलीं. निषिद्ध पण वांछनीयाच्या अपेक्षापूर्ण भावनेनें तो पेटला. त्याच्या शरीराचा कणन् कण. छातींतली हुरहूर त्याला जाणवूं लागली. त्याच्या सर्वांगाला. हुरहूर – अपेक्षा–प्रतीक्षा निषिद्ध पण वांछनीयाची. प्रमत्त यौवनाच्या संभराची. त्याच्या कवेंत येऊं घातलेल्या..... त्यानं आपलं डोकं उशीवर घासलं.अस्वस्थपणानं.

तोंच जिन्यावर पावलं वाजलीं. हो, निश्चितच. तो भास नव्हता. खास नाहीं. त्यानं वृत्तपत्र मुद्दाम डोळ्यासमोर धरलं.

तो भास नव्हता. निश्चितच नव्हता.

पण तीच येईल का? तीच येईल का? ती आल्यास त्याची शंका खरी

"दूध आणलंय्—" तिचाच आवाज ऐकूं आला. शंतनूनं वृत्तपत्र दूर केलं. ती दुधाचा पेला हातांत धरून दरवाजांत उभी होती.

त्याला वाटलं तिच्याकडे पाहून आपण हंसावं. गोड नि मुलायम. त्यानें तसं हंसण्याचा प्रयत्न केला. पण आपले ओठ अवघडल्यासारखे होतात.– हें त्याच्या लगेच लक्षांत आलं.

पण तीच हंसली. प्रसन्नपणें. नि आंत शिरली. पलीकडील स्टुलावर दुधाचा पेला ठेवण्यासाठी.

तो तिला पहात होता. त्याची नजर तिच्या पाठमोऱ्या आकृतीला लगटली होती. आसुसलेपणानें. कानशिलांत रक्ताचीं कारंजीं फुटत होतीं. वेहोपपणानें. हृदयांत अनामिक भीतीची धडधड होत होती. पण अपेक्षेनें.

त्यानं हेरलं—तिचीं पावलं अडखळत नाहींत. म्हणजे सरावलेलीं आहेत.

तिनं स्टुलावर पेला ठेवून वळायच्या आंत शंतनू उठला. ती आतां अडखळली. निमित्तमात्रच. मग जरा बाजूला सरून जाऊं लागली. शंतनूचा देह पुढें झाला. नंतर त्याचा हात. त्या हातानं तिचा दंड धरला. तिच्या दंडाचा तो मांसल स्पर्श..... रक्ताच्या थेंबाथेंबांत लाख झिणझिण्या उठवणारा.....

"हें काय?" ती उद्गारली. पण त्याला वाटलं तिच्या आवाजांत चोरटेपणा आहे.

त्यानें डावा हात तिच्या शरीराभोंवतीं टाकला. उत्तरादाखल. नि त्याच क्षणाला त्याच्या तोंडावर तिच्या तळव्याचा प्रहार झाला. त्याच्या मिटल्या डोळ्यांपुढें हिरवे, निळे, पांढरे, काळे बिंदु चमकले.

त्यानें डोळे किलकिले केले. ती नव्हती. त्यानें डोळे पुरते उघडले. नि झाल्या प्रकाराचा सारा आशय त्याच्या ध्यानांत आला. त्याच्या सर्वांगाला जणुं कांपरें आलें. हातानें पलंगाचा आधार घेऊन तो त्यावर बसला.

आतां कोणत्याहि क्षणीं गुरुजी वर येतील. शंतनूला ताड् ताड् बोलतील. "सभ्य वाटत होतां, अन् असं वागायला शरम नाहीं वाटली? वडिलांच्या शेवटच्या क्रियेसाठीं म्हणून आलांत नि असलीं कर्म करतां?" ते कितीहि अन् कांहींहि बोलले तरी शंतनू एकहि शब्द उच्चारूं शकणार नाहीं!

गुरुजी आतां शंतनूला घरांत ठेवून घेणार नाहींत, यांत संशय नव्हता. गल्लींतल्या तरण्याताठ्यांकडून त्याला लाथाबुक्केहि मिळतील.

पळून जावं का सरळ? तें कसं शक्य होईल? का ती आपल्या नांवाचा नस्ता बभ्रा नको म्हणून सासऱ्याला कांहीं सांगणारच नाहीं? हो, तशीहि शक्यता आहे. तसं होईल?

शरमेनं अन् भीतीनं शंतनू पुरा ग्रासला होता. डोक्यांत कोलाहल माजला होता. अन् येऊं घातलेल्या कडेलोटाची प्रतीक्षा



"अग बाई! ..... हे आले वाटतं — चला लवकर लपा....."

अनुक्रमणिका

करीत होता. अनोख्या अधीरतेनें. असाच कांहीं वेळ गेला.

जिन्यावर जड पावलांचा आवाज ! काय करावं तें त्याला सुचेना. पदरव जवळ जवळ येऊं लागला. त्याला गुदमरल्या-प्रमाणें झालं. त्याचा ठाव सुटला. त्याला वाटलं हृदय खोल जाऊं लागलं आहे.

"काय शंतनुराव ! अरे तुम्ही अजून झोपलां नाहीं ! मला वाटलं तुम्ही दिवा ठेवूनच झोंपीं गेलां. होऽऽऽ, प्रवासाचा शीण असतो !"

शंतनूला नवल वाटलं. सुनेनं याला कांहींच सांगितलं नाहीं कसं ? का हा म्हातारा आपली क्रूर चेष्टा तर करीत नाहीं ? पण छे ! म्हातारा सकाळच्या प्रमाणेंच 'हो ऽऽ' 'हो ऽऽ' करून बोलत होता. आपल्या कृष्णाबाईचं वैभव सांगत होता. उद्यां सकाळीं काय काय 'कार्य' करावं लागेल त्याच्या सूचना देत होता. अन् शंतनूचा जीव भांड्यांत पडत होता. तो नुसताच 'हुं हुं' करीत होता. अन् आंतल्या आंत समाधानाचे सुस्कारे टाकत होता.

"अरे, तुम्ही कांहीं बोलतच नाहीं शंतनुराव !" म्हातारा मध्येंच म्हणाला," डोकं बिकं दुखतं का ? होऽऽ तसं असेल तर सांगा ! संकोच नका बाळगूं होऽऽ ! घर तुमचंच आहे !"

शंतनूला वाटलं, त्यानेंच चांगली सबब सुचविली आहे. "हं दुखतंय् खरं बराच वेळ !" तो बोलला.

"अन् दूधहि घेतलेलं दिसत नाहीं ! होऽऽ, गरम असतांनाच घ्यायचं. बरं वाटलं असतं." असं म्हणून त्यानें पेला आणून शंतनूपुढें धरला.

शंतनूला फार चमत्कारिक वाटलं. पण कांहीं एक न बोलतां त्यानें पेला ओठाला लावला.

"थोडं चंदन उगाळून पाठवतों होऽऽ, कपाळाला लावलं म्हणजे गाऽऽर वाटेल !" म्हातारा म्हणाला.

"नको नको गुरुजी !" कांहीं एक भीतीनं शंतनु उद्गारला.

"नको कसं शंतनूराव ! तुम्ही आमचे अतिथि, तुमचं डोकं दुखतंय् तरी तुमची कांहीं एक काळजी न घेणं हा आमचा गृहस्थधर्म होईल का ? होऽऽ माणुसकी शिकवतो तो धर्म, आपले आचार नि आपले विचार चांगले ठेवावयास शिकवतो तो धर्म ! होऽऽऽ धर्माची शिकवण ती तीच. होऽऽ कुणी धर्म मानतो कुणी नाहीं; म्हणून आपण आपला सोडायचा का ? होऽऽ, अतिथीचा आदर हें धर्मकृत्य आहे ! क्षमा शक्तौ धर्माची शिकवण आहे. बरं येतों मी. सूनबाई चंदनाचा लेप घेऊन येतील. सूनबाई तुमच्या भगिनीप्रमाणें आहे. तिलाहि धर्मकर्म नीट येतें. ती कधीं चुकणार नाहीं, नि कुणाला चुकूंहि देणार नाहीं."

## सर्वोदय



पुत्र अधिकारी।
जांवई व्यापारी
मेहुणा व्यवहारी।
कंत्राटाचा
मंत्रीपदाचा हो।
काय भरवंसा
'सर्वोदय' अैसा।
साधियेला.

—'आंद्रटी'.

एवढं बोलून म्हातारा बाहेर गेला तरी शंतनू डोळे विस्फारून तसाच बसला. गुरुजींचं बोलणं ऐकतांना तो अवाक् झाला होता. तो जणूं मूढ झाला. त्याच्या विस्फारलेल्या डोळ्यांत त्याचं आश्चर्य मावेन

म्हाताऱ्याला सगळं समजलं होतं म्हणज. तरीहि तो असा वागला ? कुणी एवढा मोठेपणा दिला त्याला ? धर्मानं शिकवला ? वाड्यासारख्या मोडकळीस आलेल्या त्या जीर्ण म्हाताऱ्याचं मन इतकं मोठं ! अन् या मोठेपणाची वाच्यताहि कुठं नाहीं व्हावयाची ! हें त्याला माहीत होतं. मग मोठेपणा हा कशासाठीं ?

आश्चर्यांत त्याचा जीव गुरफटला जात होता. लाज, शरम यांपेक्षां गुरुजींच्या या दर्शनीनं तो भांबावला होता. दिपला होता......

"भाऊ चंदनाचा लेप आणला आहे !" हातांत चांदीची वाटी धरून ती उभी होती. तशीच. निर्भयतेनं. जणूं कांहीं वेळा-पूर्वीं कांहीं घडलंच नव्हतं. तिच्याशीं त्यानं लांच्छनास्पद वर्तन केलंच नव्हतं.

ती पलंगाजवळ येत म्हणाली, "झोंप तूं ! म्हणजे नीट लावतां येईल मला !" शंत-नूला वाटलं आपण उठावं नि तिचीं पावलं हातांनीं धरावींत. अश्रूनीं भिजवावींत. पण तो पलंगावर आडवा झाला. तिनं त्याला कांहींहि केलं असतं तरी क्षम्य होतं; परंतु ती भाऊ म्हणून त्याला चंद-नाचा लेप लावण्यासाठीं आली होती ! प्रसन्न मुद्रेनं अन् आत्मविश्वासानं.

"माझी चूक झाली — मोठी..." तो अडखळत बोलला.

ती चंदनाचा लेप त्याच्या कपाळावर लावीत बोलली, "मधाचा तो तूं नव्हतास भाऊ ! मला नीटसं सांगतां येत नाहीं. मी शिकलेली नाहीं..... मला भाऊ नव्हता. तो मला मिळाला."

तिच्या शब्दांनीं चंदनाच्या सौम्य गंधाचा गारवा जणुं त्याच्या कानात शिरत होता. त्याच्या शरीरांत अननुभूत पवित्रपणाची शलाका पसरवीत होता. लाज, अपराधी-पणा, आश्चर्य सारं स्वतःमध्यें रिचवीत.

*

त्या क्षणाची आठवण येताच शंतनूच्या अंतःकरणांत दिव्यत्वाचा स्फुल्लिंग लका-कतो. आपल्यांत कांही भव्यत्वाचा अंश असल्याप्रमाणें त्याला वाटतं. नेहमीच्या संवयीनं घरापुढें येऊन तो थांबलेल्या मोटार-मधून तो उतरतो. मागील दार उघडून मोठ्यानें म्हणतो. "चला बाळासाहेब !"

बाळची जुनाट पिशवी तो हातांत धरतो. दुसऱ्या हातानं बाळचं मनगट पकडतो. उत्साहानें नि उबदार आवाजांत म्हणतो, "बाळ तुझे आजोबा मोठे आहेत ! नि तुला माहीत आहे ? तुझी आई शिक-लेली नाहीं नं ? तरी ती मोठी आहे. खूप मोठी !"

मोटारींत सारा वेळ एकहि शब्द न बोललेल्या शंतनुरावांचा हा उद्रेक बाळला आश्चर्यांत बुडवतो. ● ● ●

अनुक्रमणिका






—वि. अ. तेंब्रे

**"मोठी** आई ! निघतो तर मी. आशीर्वाद मागतो तुझा."

मधुकरच्या हाताचा पायांना स्पर्श होतांच वेताच्या आरामखुर्चीत वसलेल्या यशोदामामी सावरून वसल्या. डोळे विस्फारून त्या आवाजाच्या दिशेनं पाहूं लागल्या.

"शतायुषी, विजयी हो वाळा." त्या उद्गारल्या. "मधु वाळ असा जवळ ये." त्या म्हणाल्या.

मधुकर त्यांच्या अगदीं जवळ गेला. आरामखुर्चीच्या वाजूनं गुढगे टकून वाकला. यशोदामामींच्या अंधुक दृष्टीला त्याच्या चेहेऱ्याच्या जागीं थोडं पांढरं पांढरं दिसूं लागलं. आपल्या लाडक्या नातवाचा चेहेरा त्यांनीं दोन्ही हातांनीं कुरवाळला. त्याच्या दोन्ही गालांचे त्यांनीं मुके घेतले. आणि अश्रु त्यांच्या डोळ्यांतून ओघळूं लागले. वाजूलाच थांवलेल्या त्यांच्या मुलाचे, सुनेचे आणि नातसुनेचेहि डोळे पाणावले.

सर्वांचींच हृदयें भारावलीं होतीं. कंठ भरून आले होते. मधुकरनं हातानेंच खूण केली. त्याच्या पत्नीनें – मालतीनं आपल्या कडेवरचा लहानगा अनिल यशोदामामींच्या मांडीवर ठेवला.

"मोठी आई." मधुकर भारावलेल्या कंठानं म्हणाला—

"अनिलला तुझ्या पदरांत घातला आहे. आम्हाला वाढविलंस तसा यालाहि लहानाचा मोठा आतां तुलाच करावं लागेल."

यशोदामामींनी अनिलला हृदयाशीं धरलं. आपला सुरकुतलेला गाल त्यांनीं हळुवारपणें अनिलच्या गालाशीं टेकविला. क्षणभर त्यांचे डोळे मिटले गेले. आणि.....

त्या एका क्षणांत एकाद्या विद्युन्मेन्दूनें एखाद्या अवघड उदाहरणांतले हजारो आकडे फिरवावेत तसे त्यांच्या स्मृतीनं त्यांच्या गत सत्तर वर्षांच्या आयुष्यांतले अनेक प्रसंग त्यांच्या दृष्टीपुढून सरकावून नेले. यशोदामामींना वाटत होतं आपली संसारयात्रा पूर्ण झाली आहे. कांहीं कांहीं आतां होण्याचं वाकी उरलेलं नाहीं. समाधानाचा शेवटचा श्वास सोडायला आपण मोकळे आहोंत. कोणत्याही क्षणाला...........

दीड वरीस झालं असेल. यशोदामामींना पणतु झाला होता. पहिल्या मुलाला पहिला मुलगा आणि त्या मुलालाहि पहिला मुलगा असा योग क्वचितच एखाद्याच्या भाग्यांत असतो. यशोदामामींचं भाग्य तितकं भाग्यवान होतं. त्यांची संसारयात्रा सफल झाली होती. आणि त्यावद्दल त्यांच्या मुलांनीं एक टोलेजंग उत्सव साजरा केला होता. खर्चाकडे कुणी पाहिलं नव्हतं. यशोदामामींचे सारे नातलग खेळीमेळीच्या वातावरणांत एकत्र जमले होते. होम, हवन, प्रयजन यांची दोन दिवस रेलचेल उडाली होती. अहेरांचा पाऊस पडला होता. अक्षरशः आणि मामींवर सोन्याचीं फुलं तयार करून तीं उधळण्यांत आलीं होतीं. म्हातारपणीं झालेल्या या अमाप कौतुकांत त्या भांबावून गेल्यासारख्या झाल्या होत्या.

त्यांना वाटलं होतं. पूर्वायुष्यांत भोगलेल्या अनंत यातनांची देव आतां भरपाई करून देत असावा. जितकीं दुःखं भोगलीं तितकीं सुखंहि आतां तो भोगायला देऊं पहात आहे. त्यांना व्यक्तिशः आतां सुखांची लालसा उरलेली नव्हती. तरीहि कृतज्ञतेनं त्यांचं मन भरून गेलं होतं.. मनांतल्या मनांत त्या देवाला शतशः प्रणाम करीत होत्या. म्हणत होत्या—"देवा! माझ्या नातवांना, पणतवांना सुखी ठेव. माझ्या





अनुक्रमणिका

***सत्तर वर्षांच्या यशोदामामी आतां थकल्या होत्या. परवांच त्यांना पणतु झाला तेव्हां त्या अगदीं कृतार्थ झाल्या....त्यांना वाटलें कीं शेवटचा श्वास सोडायला आतां आपण मोकळ्या आहोंत....आपली संसारयात्रा आतां संपत आली आहे....पण त्यांचा हा समज खरा नव्हता !***

---

यातना त्यांच्या वाटयाला देऊं नकोस."

त्या यातना यशोदामामीचं मन पोखरून गेल्या असल्या तरी जगाच्या दृष्टीनं त्या यातना नव्हत्या. जग त्या भूषणच समजत आलेलं होतं. यशोदामामींना मात्र तें भूषण कस्तुरीमृगाच्या बेंबीत असलेल्या कस्तुरीसारखंच नेहमी सलत आलं होतं. कस्तुरीमृगाला कस्तुरीचा उपयोग जसा कांहींच होत नसतो तसं त्यांना लाभलेलं तें यातनांचं वांझोटं भूषण होतं.त्या भूषणामुळं त्यांच्या संसारावर, जीवनावर एके काळीं घनदाट काळोख दाटवला होता. मुलांच्या कतृत्वानं अखेरीस त्या यशस्वी झाल्या म्हणून तें भूषणहि तगलं. नाहींतर काळाच्या जबरदस्त प्रवाहांत त्यांच्या घराण्याच्या नांवांबरोबर तें भूषणहि कुठल्या कुठं वाहून गेलं असतं तरी कुणाला पत्ता नसता.

**आपल्या** जीवनाची आठवण्यासारखी सुरुवात त्यांना आठवली. त्या वेळीं त्या पंधरा वर्षांच्या होत्या. आणि माधवच्या वेळेला त्यांना दिवस गेलेले होते. माहेर-सासर तसं ददातीचं नव्हतं. दोन्हीं घरांना आनंद झाला होता. यशोदाचं कौतुक होऊं लागलं होतं. तिच्या बारीक-सारीक इच्छांना डोहाळयांचं स्वरूप देण्यांत येऊं लागलं होतं आणि त्यांचे विविध अर्थ लावले जात होते. पण........

एक दिवस सुखाच्या दुधानं भरलेल्या या चरवीला दैवरूपी खोडकर वासरानं लाथ मारली. चरवी पालथी झाली. दूध शेणामातीला मिळालं. नक्की काय झालं हें समजण्याचं यशोदामामींचं तें वय नव्हतं. आणि तितका जगाचा अनुभवहि त्यांना नव्हता. पण कांहींतरी भयंकर घडलं होतं. त्यांचं घराबाहेर पडणं बंद झालं होतं. कांहीं ठराविक नात्यागोत्याचे लोक घरीं येऊन गेले होते. आणि गांवांतले लोक पहिल्यासारखे घरांत पायधूळ झाडीनासे झाले होते. आणि विशेष म्हणजे आजपर्यंत कौतुकाचा विषय बनलेली यशोदा आतां तिरस्काराचा विषय बनूं लागली होती.

घरीं आलेल्या बायाबापडया सासूबाईंशीं बोलत त्यावरून यशोदामामींना थोडा थोडा बोध होऊं लागला होता. आपल्या नवऱ्यानं कांहींतरी भयंकर कृत्य केलं आहे आणि त्यासाठीं सरकार दरबारच्या लोकांनीं त्याला पकडून नेलं आहे हाच तो बोध होता. पण त्या वेळीं या घटनेचं गांभीर्य यशोदामामींना उमजलं नव्हतं.

ते दिवस तरुणांचीं मनं राष्ट्रीय विचारांनीं भारलीं जाण्याचे होते. काठीला सोनं बांधून काशीला सुखरूप पोचावं असं ब्रिटिशांचं सुराज्य लोकांना नकोसं वाटूं लागलं होतं. जीवंत मनाच्या तरुणांना आपली मातृभूमि स्वतंत्र व्हावी असं वाटतं होतं. त्यासाठी प्रयत्नहि आपापल्यापरी ते करीत होते. कलकत्त्याकडे भर दिवसां ब्रिटिश अधिकाऱ्यांचे मुडदे पडूं लागले होते.. पुण्यापर्यंत तें लोण येंऊन पोचलं होतं. गुप्त तयारीची, लढाईची, शस्त्रास्त्रांची भाषा बोलली जात होती.

याच वावटळींत यशोदामामींचा नवरा शिरू भट सांपडला होता. ब्रिटिशांशीं लढायचं तर शस्त्रें पाहिजेंत. शस्त्रें हवींत तर पैसा पाहिजे. आणि पैशासाठीं दरवडे घालायला हवेत असं तरुण देशभक्तं मनाचं साधं सरळ गणित होतं. शिरू भट अशाच एका दरवडयाच्या मामल्यांत पोलिसांच्या हातीं लागला होता. प्रतिकार मोडून काढण्यासाठीं दरवडयाच्या वेळीं रक्तपातहि झाला होता. कट खून, लुटालूट अशा विविध आरोपांवरून शिरू भट आणि त्याचे साथीदार यांच्यावर खटला भरला गेला व सर्वांना विविध मुदतीच्या शिक्षा झाल्या होत्या. शिरू भटाच्या वाटयाला दहा वर्षांची सक्तमजुरी आली होती.

सामान्य लोकांच्या दृष्टीनं शिरू भट एक सामान्य दरवडेखोर ठरला होता. आणि यशोदामामी एका दरवडेखोराची पत्नी म्हणून ओळखल्या जाऊं लागल्या होत्या. त्या वयांत त्यांना वाटलं होतं, झालं आपलं आयुष्य इथंच संपलं. लोक कांहीं कांहीं बोलत. तुरुंगांत एकदा गेलेला माणूस पुन्हां परत येण्याची गोष्टच नको असाच त्यामुळं मामींचा समज होऊन बसला होता. धड ना दुःख धड ना आनंद अशा चमत्कारिक मनस्थितींत त्या सांपडल्या होत्या. दुःखानं काचून जावं इतकी नवऱ्याशीं त्यांची समरसता झालेली नव्हती. आणि कुठलाहि आनंद मानावा अशी परिस्थिति नव्हती. कधी त्यांच्या मुद्रेवर हंसूं उमटलं की, लोक डोळे फाडून त्यांच्याकडे पाहूं लागत.

आणि अशाच परिस्थितींत माधवचा जन्म झाला. त्या जन्माच्या वेळी आनंदाच्या सत्कारापेक्षा दुःखाचे उसासेस अधिक ऐकायला मिळाले होते. यशोदामामींना वाटे, आपलं आयुष्य हें असंच दुःखांनीं सतत झाकलेलं राहणार आहे कीं काय? आणि तें कशासाठीं ? आपल्याला कोणताच भविष्यकाळ नाहीं कीं काय ?

माधव लहानाचा मोठा होऊं लागला तसं मामींचंहि मन प्रौढ बनूं लागलं होतं. त्यांना गोष्टी आतां समजूं लागल्या होत्या. आपला नवरा एखादा साधा दरवडेखोर नाहीं तर थोर मनाचा राष्ट्रभक्त वीर आहे याची जाणीव त्यांना होऊं लागली होती. अशा शूर माणसाची आपण पत्नी आहोंत व त्याचाच हा माधव मुलगा आहे हा अभिमान त्यांच्या मनांत बाणूं लागला होता. ही घटना दुःख करायची नसून आनंद मानण्याची आहे हा साक्षात्कार त्यांना झाला होता.

या नव्या जाणिवेनं आपल्या आणि माधवाच्या जीवनांत त्यांना नवा रस वाटूं लागला. त्यांचा दुर्मुखलेपणा कुठच्याकुठं नष्ट झाला. नवरा तुरुंगांतून सुटून येण्याची त्या आतुरतेनं वाट पाहूं लागल्या. शिरू भटाबद्दल कुणी अनुदार उद्गार काढलेले त्यांना खपेनासे झाले. एकदा कशावरून तरी नोकरदार नवऱ्याची बायको असलेली त्यांची बहीण त्यांना टाकून बोलली होती.








"माझ्या नवऱ्यानं कांहीं दरवडे घातले नाहींत." ती म्हणाली होती.

यशोदामामी त्यावर उसळल्या होत्या:

"साहेबाचे बूट चाटण्यापेक्षा आणि त्यांच्या बुटाच्या लाथा खाण्यापेक्षा त्यांना हुसकण्या-साठीं दरवडेखोर बनणं लाख पटीनं चांगलं बरं!" त्यांनीं उत्तर दिलं होतं.

शिरू भट तुरुंगांतून सुटून आल्यावर एक वेगळाच माणूस बनला होता. त्याची पूर्वीची हूड वृत्ति नष्ट झाली होती. देशभक्तीचं वारं त्याच्या नसानसांतून अजूनहि स्फुरत असलं तरी त्यात पहिल्यासारखा उच्छृंखल-पणा नव्हता. आपली चूक त्याला समजून आली होती. त्याच्या बरोबरीचे तरुण संसारांत आणि समाजांत स्थिरावले होते. मानमान्यता पावलेले होते. त्या पार्श्व-भूमीवर आपली चूक त्याला अधिकच भडक दिसूं लागली असल्यास नवल नाहीं. एके काळीं त्याच्याशीं सहकार्यानें वागणारे त्याची आतां ओळखहि टाळण्याचा प्रयत्न करतांना तो पहात होता. या गोष्टी त्यानें अपेक्षिल्या नव्हत्या. दरवडे घालून देशभक्तीच्या नांवा-खालीं त्यानं बरीच गुप्त माया जमवून ठेविली आहे असे आपल्यावद्दलचे प्रवाद जेव्हां तो ऐकूं लागला तेव्हां तर तो हत-बुद्ध झाला होता.

देशभक्तांना केवळ बंदीशाळांचीच नव्हे तर, लोकप्रवादांचीहि बक्षिशी मिळत असते असा नवाच शोध त्याला लागला होता. या परिस्थितीनं आणि तुरुंगांतल्या कष्टांनीं त्याला खंगून गेल्यासारखं झालं होतं.

पण यशोदामामींनीं त्याला धीराचा हात दिला. जिथून धीराची अपेक्षा शिरू भटानं केली नव्हती तिथून मिळालेल्या या धीरानं प्रथम तो चकितच झाला. त्याला वाटलं होतं आपली पत्नी आपल्याला यापुढं एक-सारखी छेडीतच राहील, आपल्या आयुष्याचं नुकसान करणारा याच दृष्टीनं ती आपल्या कडे पाहील. पण त्याची ही कल्पना चुकीची ठरली होती. बायकोचा हा आधार त्याला नवजीवनदायी ठरला होता.

परंतु तेवढ्यावर संसाराचा गाडा धक-णार नव्हता. गाडीला वंगण, त्याचप्रमाणें संसाराला अर्थार्जन आवश्यक असतं. तो प्रश्नहि नंतर एका राष्ट्रीय वृत्तीच्या वकिलाच्या सहा-य्यानं सुटला होता. शिरू भटाला कोणी दरवडे-खोर म्हणून तर कोणी क्रांतिकारक म्हणून जवळ करायाला धजत नसत. तें धाडस या वकीलानं दाखविलं होते. महिना आठ रुपये पगारावर आपल्या कारकुनीचं काम त्यानं शिरू भटाला दिलं होतं. मीठ भाकरी-सोय झाली होती. यशोदामामींनीं कुल-स्वामिनीची खणानारळानं ओटी भरली होती.

शिरू भट हुशार होता. बुद्धिमान होता. वकीलाच्या भरभराटीबरोबर त्याचीहि चलती झाली होती. हातीं दोन पैसे खेळायला लागले होते. माधवाला आणखी तिघे भाऊ झाले होते. यशोदामामींचा संसार फुलायला लागला होता. त्यांच्या अंगावर दोन ठळक दागिने झळकूं लागले होते. एक आड-गिऱ्हाईकी घरहि शिरू भटानं खरेदी केलं होतं. आपल्या सत्तेच्या घरांत पाऊल टाकतांना यशोदामामींना कोण आनंद झाला होता.

तो प्रसंग यशोदामामींच्या डोळ्यांपुढें उभा राहिला. त्यांची अंध दृष्टि थोडी किलकिली झाली. आपल्या हाताला धरून गृहप्रवेश करणाऱ्या आपल्या शूर पतीची मूर्ति त्यांच्या दृष्टिपुढें तरळूं लागली.

"ही सारी तुझी पुण्याई—" शिरू भटाचं हे उद्गार फोनोप्लेटवरून कुणी ऐकवावेत असे त्यांना ऐकूं येऊं लागले. एक दीर्घ सुस्कारा त्यांनीं सोडला.

लोकांच्या—त्यांतले त्यांत नातलगांच्या—कुत्सित प्रवादांना मात्र खंड पडला नव्हता. शिरूभटाची चलती पाहून ते म्हणूं लागले, दरवडयांचा पैसा आता जमिनींतून बाहेर येऊं लागलाय. प्रसंगविशेषी झालेली असली जहरी टीका यशोदामामींच्या काळजाला झोंबून जाई. पण आतां त्यांना त्या जहराची संवय झाली होती. शिवाय शिरूभटाला एक देशभक्त क्रांतिकारक म्हणून ओळखणारेहि होतेच. त्यांच्याकडून होणाऱ्या आदर-सत्कारामुळें कुत्सित टीकेचें जहर कितीतरी सुसह्य होत असे. त्याची प्रखरता कमी होत असे.

माधव मॅट्रिकला आला होता. तो कॉलेजांत जाईल. मोठा अधिकारी होईल अशीं सुखस्वप्नें यशोदामामींना पडूं लागलीं होतीं. पण दैव दुसरींच स्वप्नें पहात होतें.

देश पुन्हां आंदोलनांनीं पेटला होता. महात्मा गांधीजींच्या दांडी यात्रेनं देशांत एक आगळं निर्भयतेचं वातावरण निर्माण केलं होतं. विद्यार्थी शाळा-कॉलेजांतून बाहेर पडूं लागले होते. संप, सत्याग्रह, निरोधन, धरपकड आणि लाठीमार, गोळीबार, हे नित्याचे शब्द होऊन बसले होते.

एका क्रांतिकारक बापाचा मुलगा असलेला माधव या वातावरणापासून अलिप्त राहणेंच अशक्य होतें. एक दिवस एका विद्यार्थी मिरवणुकीच्या अग्रभागीं तिरंगी झेंडा घेऊन निर्भयतेनं घोषणा करीत चाललेल्या माधवला पाहून यशोदामामींच्या उरांत धस्सच झालं. त्यांना वाटलं, पोरगाहि बापाच्या वळणावर जाणार आणि त्याच इतिहासाची पुनरावृत्ति होणार!

वेगानं पुढें पुढें सरकत असलेल्या मिरव-णुकीकडे त्या जीव मुठींत धरून पाहूं लागल्या.

माधव संथा देत होता.

"नही रखना नही रखना जालीम सरकार नही रखना!"

आणि सारी मिरवणूक तालासुरावर हें कडवं कंठरवानं उच्चारीत होती. मधूनच "महात्मा गांधीकी जय, पंडित मोतीलाल नेहरू की जय, लाला लजपतराय की जय, बाबु सुभाषचंद्र बोस की जय, वंदेमातरम्!" अशा घोषणा होत होत्या.

यशोदामामींना वाटलं. माधव आपल्या हातचा सुटला.

आणि तेवढ्यापुरतं तें खरंहि होतं. माधवचं घराबाहेर आणि शाळेबाहेर पडलेलं पाऊल तुरुंगांतच स्थिरावलं होतं.

रोज नवनवीन बातम्या कानावर येत. सत्याग्रहींना चावकांनीं फोडून काढलं. तुरुंगांत राजकीय कैद्यांना मारहाण झाली. कैद्यांनीं अन्नसत्याग्रह मांडला. अमूक सत्याग्रही तुरुंगांतच एकाएकीं वारला.




—सर्व संकटे, अडथळे दूर सारून
लोकशाही समाजवादाच्या
दिशेनें प्रगतीची वाटचाल झाली पाहिजे.
आज आपण जो मार्ग चोखाळतो आहोत
त्यावरील आपल्या निष्ठेचा पुनरुच्चार करु या.
विषमता व अन्याय ह्यांना मूठमाती दिली पाहिजे.
वैयक्तिक स्वातंत्र्य, निष्ठा, प्रामाणिकपणा
आणि कार्यक्षमता हाच जेथें मानदंड
मानण्यात येईल अशा समाजाची
आपणाला भारतात उभारणी
करावयाची आहे त्याची आठवण राहूं द्या.

**... ध्येयाच्या दिशेने आगेकूच करू या**

प्रसिद्धि संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई

या बातम्या यशोदामामींना अस्वस्थ करीत. नवरा तुरुंगांत होता तेव्हां तुरुंग म्हणजे काय याची त्यांना तितकी कल्पना नव्हती. अज्ञानांत त्या सुखी होत्या. पण आतां तशी गोष्ट नव्हती. आपल्या माधवचं तुरुंगांत काय होत असेल नि काय नाहीं ही कल्पना त्यांना झोंप येऊं देत नसे. त्या नवऱ्याला विचारीत—

"तुरुंगांत जेवायला काय हो मिळतं!"

"कांजी आणि भाकरी नांवांचा एक पदार्थ कसल्या तरी भाजीबरोबर." शिरू भट स्थित-प्रज्ञाप्रमाणं उत्तर देई.

"अन् काम काय करावं लागतं तिथं'?

"मोठमोठ्या जात्यांवर दळण दळावं लागतं नाहींतर तेलघाण्यावर तेल काढावं लागतं, ढापण्या बैलासारखं." शिरू भट शून्य मनानें आढ्याकडे पहात खुलासा करी.

यशोदामामी शहारून जात. आपला माधव अजस्त्र तेलघाण्यावर गरगरा फिरत असल्याचीं स्वप्नं त्यांना पडत आणि त्या दचकून उठत.

मधूनच तुरुंगांतून सुटून आलेले माधवचे मित्र घरीं भेटायला येत. तुरुंगांतल्या जीवनाचीं रसभरित वर्णनं करीत. असाच एकदा माधवचा मित्र नानू बोरसे घरीं भेटायला आला होता. त्याचे पुढचे दोन दांत पडले होते.

मामींनीं त्याला विचारलं "इतक्यांतच रे कसे दात पडलेत नि म्हातारा झालास!"

बोचऱ्या तोंडानं तोंड भरून हंसत नानू उत्तरला होता.

"मामी म्हातारा नाहीं झालों अजून. हा ब्रिटिशशाहीचा तुरुंगांतला प्रसाद आहे."

"म्हणजे ?" थोड्यां भयानं, थोड्या आश्चर्यानं मामींनी विचारलं.

"आम्हांला सत्याग्रही म्हणून पकडलं. कोर्टात शिक्षा झाली आणि धुळयाच्या तुरुंगांत आम्हांला पाठविण्यांत आलं." नानू बोरसे सांगूं लागला. "तिथला जेलर म्हणे फार राजनिष्ठ आहे. आम्हाला पाहतांच त्याच्या पायाची तिडीक मस्तकाला पोंचली. साला स्वराज्य मंगते काय–असं म्हणत प्रत्येक सत्याग्रही कैद्याला त्यानं ठोसे लगावले. त्या ठोश्याचा हा प्रताप आहे मामी."

आणि नानू पुन्हां तोंड भरून अभिमानानं हंसला.

पण मामींच्या अंगाचा मात्र थरकांप झाला होता. त्यांना वाटलं माधवचे देखील असेच दांत पडले असतील काय?

अशींच तीन वर्षं निघून गेलीं. आंदोलनाचे ताबूत थंडावले होते. सत्याग्रही सुटून येऊं लागले होते. त्यांत माधवचीहि सुटका झाली होती. पण मुलाच्या बंधमुक्ततेचा निर्भेळ आनंद यशोदामामी चाखूं शकल्या नव्हत्या. माधव घरीं आला तों त्याचं पितृछत्र कायमचं हिरावलं गेलं होतं. मामींच्या संसाराचा एकुलता एक आधार नाहींसा झालेला होता. तीन मुलांच्या संगोपनाची बिकट समस्या त्यांच्या पुढं उभी राहिली होती. शिवाय माधवच्या भवितव्याची काळजी होती ती वेगळीच. पतिनिधनाचं दुःख करायलाहि यशोदामामींना फुरसद मिळाली नव्हती.

नवऱ्याचा मार्ग चुकला होता. पण त्याचं ध्येय उदात्त होतं. मन विशाल होतं. ती जाणीव ठेवून यशोदामामींनी त्याला कधीं दूषण लावलं नव्हतं कीं दोष दिला नव्हता. मुलाच्या बाबतींतहि त्यांनी तेंच धोरण ठेविलं होतं. माधवनं शाळा सोडावी आणि स्वातंत्र्याच्या चळवळींत उडी घ्यावी हें त्यांना आवडलं नव्हतं. आपली ही नापसंती त्यावेळी त्यांनी व्यक्तहि केली होती. पण माधव तुरुंगांतून सुटून आल्यावर हा वाद त्यांनी पुन्हां उपस्थित केला नव्हता. त्या एकच अपेक्षा बाळगून होत्या. नवरा नंतर जसा मार्गाला लागला तसंच माधवनंहि मार्गाला लागावं. त्यासाठी देवाला त्या नवस करूं लागल्या.

कांहीं कांहीं वेळेला असं घडत असतं कीं आपण नवस बोलण्यापूर्वींच देवानं आपल्या नवसाला पावायचं ठरवून टाकलेलं असतं. माधवला कांहीं सांगावं लागण्यापूर्वींच तो धोपट मार्गानं चालूं लागलाहि होता..

आपल्या राष्ट्रसेवेच्या कल्पनांत कांहीतरी गफलत आहे याची जाणीव माधवला तुरुंगांत असतानांच होऊं लागली होती. राष्ट्रभक्तांमध्येंहि तरतम भाव होते. बोलणं एक तर कृति त्याविरुद्ध अशी परिस्थिति होती. इंग्रजी शिक्षण आणि शाळा कॉलेजांवर निखारे फिरवा म्हणणारे इंग्रजींतच बोलत होते. इंग्रजीच वर्तमानपत्रें वाचीत होते आणि त्यांचे नातलग त्यांना इंग्रजी ग्रंथच वाचायला आणून देत होते. राजबंद्यांतहि अ, ब, क अशी वर्गवारी पडत होती. त्यांच्या सरबराईंत तफावत होती.

एका प्रसंगाचं माधवला राहून राहून नवल वाटायचं.

त्याच्याच बरोबरच्या एका 'क' वर्गीय सत्याग्रही कैद्याचे वॉर्डरनें ठोसा लगावल्यामुळें कांहीं दांत निखळले होते. त्याला साधा औषधोपचारहि कुणी केला नव्हता कीं त्याची दखल बाहेर कुणी घेतली नव्हती. आणि तेंच एका मोठ्या पुढाऱ्याला थोडा दाढदुखीचा उपद्रव झाला म्हणून कोण धांवपळ झाली होती. बाहेरचे खास डॉक्टर

खास वॉर्ड, खास परिचारिका, खास खाट. असा थाटमाट उडाला होता. त्याचा अर्थच माधवला समजूं शकला नव्हता.

आणि म्हणूनच तुरुंगांतून सुटून आल्यावर देशप्रेमाच्या त्याच्या कल्पना पूर्वीच्या उरल्या नव्हत्या. मॅट्रिकची परीक्षा दिलेली नाहीं म्हणून खाजगी नोकरीहि मिळूं शकत नाहीं हें कटु सत्य जेव्हां त्याच्या अनुभवाला आलं तेव्हां अंजन घालावें तसे त्याचे डोळे उघडले होते. आपल्या देशप्रेमाच्या आणि देशभक्तीच्या कल्पनांना चुकीची दिशा मिळाली होती ही बोंच त्याला सलूं लागली होती. गरिबाचा त्याग हा त्याग नसतो हाहि अनुभव त्याला पदोपदीं येऊं लागला होता.

एक दिवसाची गोष्ट. एका सडेतोड आणि स्पष्टवक्त्या गृहस्थाशीं त्याचा कुणीतरी परिचय करून दिला होता.

"हे एक मोठे देशभक्त आहेत. देशासाठीं त्यांनी शिक्षणावर देखील लाथ मारली." परिचय करून देणाराने मनापासून ही माहिती दिली होती.

पण परिणाम झाला मात्र उलटाच. त्या सडेतोड गृहस्थांनीं डोळे मिचकावून माधवकडे पाहिलं.

"अभ्यास जमला नाहीं कीं देशासाठीं शाळा सोडायची चांगली सोय झाली नाहीं अलिकडे ? म्हणजे तुमच्याबद्दल नाहीं म्हणत. पण अशीं पुष्कळ उदाहरणें पाहायला मिळतात म्हणून म्हणतों." तो गृहस्थ म्हणाला.

माधवला वाटलं घरणी दुभंग होईल तर बरं ! आयुष्यांत घडलेली चूक दुरुस्त करण्याचा त्यानं निश्चय केला. आणि त्यांत अखेरीस त्याला यशहि आलं. माधव संसारांत आणि जीवनांत रमलेला पाहून यशोदामामींनीं सुटकेचा निश्वास टाकला. १९४२ च्या 'छोडो भारत' आंदोलनाच्या वेळीं माधव अस्वस्थ अवश्य झाला होता. पण या प्रवाहांत तो वाहून मात्र गेला नव्हता.

**आणि** मग स्वातंत्र्य आलं. देशांतल्या तरुणांना नवीं क्षेत्रें खुलीं झाली. माधव थोडक्याच अवधींत एक बडा अधिकारी झाला होता. यशोदामामींना नातू झाला होता. शिक्षण पूर्ण करून तोहि आतां एका मोठ्या कारखान्यांत तंत्रज्ञ म्हणून नोकरीला राहिला होता. त्याच्या नवऱ्याला दहा वर्षांत जो पगार मिळाला

# हरिभाऊंचें एक अज्ञात लिखाण



**( कै. आजगांवकर लिखित अप्रकाशित आठवणींतून )**

**माझ्या** 'महाराष्ट्र कविचरित्रा'चा पहिला भाग मुंबईत छापत होता व त्याचीं प्रुफें पुण्यास मजकडे येत असत. कविवर्य मुक्तेश्वराच्या चरित्राचीं प्रुफें मजकडे आलीं असतां तीं हरिभाऊंच्या वाचनांत आली व "मुक्तेश्वर आणि मोरोपंत या दोन कवींत श्रेष्ठ कोण" या प्रश्नाचा विचार करून मुक्तेश्वरच श्रेष्ठ असें जें मी सदर चरित्रांत लिहिलें आहे तें हरिभाऊंसहि पटलें; परंतु, त्यांचे असें म्हणणें पडलें कीं हें विवेचन थोडेसें अधिक विस्ताराने केलें पाहिजे. तेव्हा मी त्यांना विनंति केली कीं तें विवेचन तुम्हीच लिहून द्या, म्हणजे लेखांत तें मी समाविष्ट करीन. त्याप्रमाणें त्यांनी पुढील सुंदर मजकूर लिहून दिला तो माझ्या कविचरित्राच्या पहिल्या भागाच्या प्रथमावृत्तींत पृष्ठ ५१–५२ वर आला आहे.....

"महाराष्ट्र वाङमयांत सगळ्यांत श्रेष्ठ कवि कोण हा एक वाद आज बरेच दिवस महाराष्ट्र कवींच्या अभिमानी वाचकांत प्रचलित आहे. वस्तुतः पाहतां हा वाद करणें एका दृष्टीनें त्या लेखांत कोणकोणते गुण अवश्य आहेत याबद्दल एकवाक्यता अद्याप झालेली नाही आणि पुढें कधीं होईल हेंही संभवनीय नाहीं. वाचकांच्या अभिरुचीवर कोणत्याहि कवीचें काव्य 'हृदयाल्हादक' आहे कीं नाहीं हें अवलंबून असावयाचें आणि वाचकांची अभिरुची ही त्यांच्या शिक्षणावर व परिस्थितीवर अवलंबून असावयाची. ज्याप्रमाणें उत्कृष्ट अन्नाच्या परिपोषक षड्रसांपैकीं कोणता रस श्रेष्ठ हें ठरविणें अशक्य. त्याचप्रमाणें उत्कृष्ट काव्याच्या परिपोषक नवरसांपैकीं अमुक एक रस श्रेष्ठ हें ठरविणेंहि अशक्य आहे. तथापि येवढी गोष्ट खरी की ह्या रसांचें सुद्धां मिश्रण बनून तें रसिकांपुढें आलें असतां त्यांच्या आत्म्यास एकदम आल्हाद होतो. हा आल्हाद होण्यास विशेष कारण काय म्हणून शोध करतां तें मात्र सांगता येत नाहीं, साधारण कारणें सांगतां येतात; तशीच गोष्ट काव्यांची आहे. कोणत्याहि प्रतिभावान कवीचें काव्य वाचलें असतां रसिकास आनंद होतो. परंतु अमुक एक विवक्षित कवि इतर सर्वांहून श्रेष्ठ हें ठरविण्यांत ज्याची त्याची विशेष रुचीच कारण होय. मराठी कवींत श्रेष्ठ कोण, या प्रश्नांचा खल करितां करितां मुक्तेश्वर श्रेष्ठ कीं मोरोपंत श्रेष्ठ हा प्रश्न अखेर उत्पन्न होतो, या दोहोंपैकीं एक कोणी तरी श्रेष्ठ आहे अशाबद्दल जणू काय सर्वांची एकवाक्यता झालेलीच आहे, आणि ती तशी झालेली आहे, असें धरून चालावयाचें तर या वादाचा निकाल, माझ्या मतें मुक्तेश्वराला श्रेष्ठता देऊनच होणार. आपण सहज बागेत हिंडावयास गेलो असतां एकदम दोन फुलें आपल्या नजरेस पडलीं. एक आपल्या सुंदर रंगानें आपल्या दृष्टीला वेधून घेणारें आणि दुसरें आपल्या घ्राणेंद्रियास आनंद देणारें. या दोन फुलांपैकीं श्रेष्ठ कोणचें असें म्हटलें तर सुगंधपूर्ण तेंच

श्रेष्ठ, असें उत्तर चटकन् जिभेवर उभें राहील; असें होण्याचें जें कारण तेंच मोरोपंतांच्या काव्यापेक्षा मुक्तेश्वराचें काव्य श्रेष्ठ असें म्हणण्यास कारण होय. पदलालित्यादि गुण काव्यास आल्हादक करण्यास साधन होत, परंतु काव्यसर्वस्व त्यांत नाहीं. ज्याप्रमाणें सुंदर रंग, सुंदर आकृति, इत्यादि गुण अप्रत्यक्षरीतीनें मनास आल्हाद देतात, सुगंधाप्रमाणें एकदम अंतःकरणाला भिडत नाहीत, त्याचप्रमाणें पदलालित्य, अनुप्रास, यमक, अलंकार हे अप्रत्यक्ष रीतीनें आल्हाद देणारे होत. सुवर्णस्थालींत वाढलेलें अन्न उत्तम रीतीनें बनलेलें नसलें तर मनास आल्हाद काय होणार ? तीच स्थिति मोरोपंताच्या काव्याची होय. त्यांच्या कवितेचा बाहेरचा उठाव फार उत्तम. परंतु जो कांहीं अंतःस्थ परिपाक तो मुक्तेश्वराच्या रसपरिपोषाइतका आल्हादकारक नाहीं. या म्हणण्याचा अर्थ मोरोपंतांचा रसपरिपोष गचाळ, असें मात्र कोणी समजूं नये. दोन उत्तम पाकनिष्पादकाच्या रसपरिपाकांत श्रेष्ठता ठरवितांना एकास श्रेष्ठ ठरवितांना दुसऱ्यास विशेष प्रकारें न्यूनत्व येतें असें नाहीं, त्याचप्रमाणें हेहि आहे. मुक्तेश्वर व मोरोपंत दोघेहि उत्तम कवि, परंतु त्या दोघांत श्रेष्ठता कोणाकडे येते हें ठरविणें झाल्यास ती मुक्तेश्वराकडेच येते, एवढेंच माझें म्हणणें आहे."

पुढें माझ्या कविचरित्राचा पहिला भाग प्रसिद्ध झाल्यावर त्या संबंधानें 'विविध ज्ञानविस्तार' मासिकांत एका गृहस्थांनीं एक टीकात्मक लेख लिहिला. त्यांत त्यांनीं सुंदर काव्य कोणतें याच्या विवेचनाचा सुंदर नमूना म्हणून, वरील विवेचनाचा उल्लेख केला आहे. अर्थातच त्याचें श्रेय त्यांनीं मला दिलें आहे, परंतु तें विवेचन हरिभाऊंनी केलेलें असल्यामुळें त्या श्रेयाचे खरे अधिकारी तेच होत. •••

---

नव्हता तितका पगार त्यांच्या मधुकरला एका महिन्याला मिळूं लागला होता. एका मोठ्या घरची एकुलती एक कन्यका त्याला पत्नी म्हणून लाभली होती. अनिलच्या जन्मानं या यशोमंदिरावर कळस चढला होता.

हा सारा इतिहास, हे सारे प्रसंग यशोदामामींच्या दृष्टिपुढून त्या एका क्षणांत सरकले होते.

पणवताच्या—अनिलच्या—जन्मानंतर संसार- यात्रा पूर्ततेचा तो सोहळा संपला तेव्हां मामींनीं देवाची प्रार्थना केली होती, "देवा आतां असेच भरल्या घरांत आणि भरल्या सुखांत डोळे मिटूं दे रे बाबा !"

पण. .

ऐन दिवाळींत सारा देश खळबळून निघाला. मित्र मित्र म्हणून घातकी चीननें भारतावर सशस्त्र आक्रमण केलें होतें. मोठ्या शर्थीनं मिळविलेलं स्वातंत्र्य धोक्यांत आलं होतं. देशाला सैनिकांची आणि सैनिक अधिकाऱ्यांची तांतडीची गरज निर्माण झाली होती. भराभर तरुण पुढें होऊं लागले होते. मधुकरनेंहि आपलं नांव दाखल केलं होतं आणि त्याला कमिशन मिळालं होतं.

यशोदामामींना हें जेव्हां समजलं तेव्हां त्यांना आनंदहि झाला आणि दुःखहि ! त्यांना वाटलं आपण समजून चालतों तशी राष्ट्राची आणि जनतेची संसारयात्रा आतां निर्वेध झाली तसा प्रकार नाहीं. संसारयात्रा कधींच संपत नाहीं आणि ती निर्वेधहि कधींच होत नसते. हें चक्र हें रहाटगाडगं असंच चालू रहाणार... त्याला खंड नाहीं. त्याला अंतहि नाहीं.

"अनिलला तुझ्या पदरांत घातला आहे."

या मधूच्या उद्गारांवर असल्याच विचारांचा कोलाहल त्यांच्या मनांत हिंदोळत होता. अनिलच्या तोंडावरून त्यांनीं हात फिरवला.

"मधु—" त्या म्हणाल्या, "तुझे आजोबा नि वडील स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं लढले. तूं स्वातंत्र्य टिकविण्यासाठी लढाईवर निघाला आहेस. कुणी सांगावं, उद्यां अनिलला जगाचा विनाश टाळण्यासाठीं लढाईवर जावें लागणार नाहीं कशावरून ?.... मंगळावरून किंवा चंद्रावरून जगावर स्वारी होणार नाहीं कशावरून ?.... वाढवीन अनिलला मी, जीवांत जीव आहे तोपर्यंत. ही परंपरा खंडित होणार नाहीं. परवा मोठा समारंभ करून तुम्ही माझी संसारयात्रा पूर्ण केलीत पण मी ती चालूंच ठेवणार आहे... परिस्थिति ती मला चालू ठेवायला भाग पाडणार आहे."

अनिलला त्यांनी मालतीच्या स्वाधीन केलं. मधूच्या मस्तकावरून त्यांनीं हात फिरवला आणि पदरानं आपले डोळे टिपले.

भूतकाळांतून त्यांचं मन भविष्यकाळांत झेपावूं लागलं. थकलेला, बलिदान व्यर्थ झालं अशा भावनेनं कोमेजलेला मधुकर लढाईवरून परत येत आहे आणि त्याच्या खांद्यावरची बंदूक अनिल आपल्या खांद्यावर घेत आहे असं दृश्य त्यांना दिसूं लागलं.

युद्ध आणि शांतता, आशा आणि वैफल्य हें संसारचक्र; ही संसारयात्रा अशीच चालू राहणार, ती थांबविणं कुणाच्या हातचं नाहीं, त्यांना वाटलं आणि त्यांना शांत शांत वाटूं लागलं.

•••







# 'क्रिकेट स्पर्धा आणि तुम्ही'....

**"दीपावली"चा** फेब्रुवारी ६४ अंक आम्ही क्रिकेट-विशेषांक म्हणून प्रसिद्ध केला होता. हा अंक सर्वार्थानें स्मरणीय असा ठरला. त्याचें प्रमुख वैशिष्टय म्हणजे एकसुरीपणा टाळून निरनिराळया पातळयांवरून लिहिलेले माहितीपूर्ण लेख. असा अगदीं वेगळया प्रकारचा विशेषांक काढून मराठी क्रीडाविषयक साहित्यांत मोलाची भर टाकल्याबद्दल अनेकांनीं तोंड भरून "दीपावली"चें अभिनंदनहि केलें.

याच अंकांत वाचकांसाठीं आम्ही दोन स्पर्धा जाहीर केल्या होत्या. नेहमींच्या प्रथेनुसार वाचकांचा स्पर्धांना चांगला प्रतिसाद मिळाला व अधिक वाचकांना भाग घेतां येण्यासाठीं मुदतहि वाढवावी लागली. या स्पर्धांचा निर्णय आतां जाहीर करीत आहोंत.

**स्पर्धा १ :** (क्रिकेटवर बंदी कां घालूं नये ?)

**प्रथम पारितोषिक (रु. १०) : मनोहर राखे, मुंबई.**

दुसऱ्या पारितोषिकास कुणाचाच लेख पात्र ठरला नाहीं.

**स्पर्धा २ :** (क्रिकेट आणि तुमची परीक्षा)

**गुणानुक्रमें यशस्वी स्पर्धक**

**१. श्री. शरद गणेश खांडेकर, सांगली**

**२. श्री. सुधीर बोधनकर, नागपूर**

**उल्लेखनीय उत्तरें :**

सर्वश्री उल्हास नारायण शिंदे (वडाळा),
रमेश गजानन मिरजकर (वेळगांव),
शंकर वि. वागळे (दादर),
कमळाकर परांजपे (रांची),
देवेंद्र ढोले (नागपूर),
अरुण मालणकर (मुंबई),
राजाभाऊ घामणकर (महाड).

स्पर्धा २ साठीं आम्ही फक्त एकच पारितोषिक ('दीपावली' वर्षभर विनामूल्य) जाहीर केलें होतें. पण वाचकांचा वाढता उत्साह लक्षांत घेऊन ही संख्या दोन केली आहे.

क्रमांक २ च्या यशस्वी स्पर्धकाला "दीपावली" सहा महिने विनामूल्य पाठविण्यांत येईल.

या स्पर्धांच्या परीक्षणाची जबाबदारी आम्ही क्रिकेटचे व्यासंगी समालोचक श्री. बाळ. ज. पंडित यांच्याकडे सोपविली होती. हें काम त्यांनीं चोखपणें पार पाडलें याबद्दल आम्ही त्यांचे आभार मानतों. स्पर्धांसाठीं आलेलें साहित्य वाचून त्यांच्या ज्या प्रतिक्रिया झाल्या त्या त्यांनीं सोबतच्या लेखांत मांडल्या आहेतच. स्पर्धा क्र. १ मधील प्रथम क्रमांकाचा लेख "दीपावली"च्या जुलै ६४ अंकांत प्रसिद्ध केला जाईल.

या स्पर्धांत भाग घेणाऱ्या सर्व स्पर्धकांना मनःपूर्वक धन्यवाद आणि यशस्वी स्पर्धकांचें अभिनंदन.

**—संपादक**

# स्पर्धेच्या उत्तरांविषयीं....

—बाळ ज. पंडित

**यंदाचा** "दीपावली"चा क्रिकेट विषयक पुरवणी अंक अतिशय वैशिष्टयपूर्ण होता असें अनेक वाचकांनीं कळवलें आहे. माहिती आणि मनोरंजन ह्या दोन्ही दृष्टीनें तो अंक निश्चितच आगळा आणि वाचनीय ठरला. 'क्रिकेटवर बंदी घाला' ही एक नावीन्यपूर्ण स्पर्धा त्या फेब्रुवारी अंकाचें एक चांगलेंच आकर्षण ठरलें.

अनेक वाचकांनीं या स्पर्धेत भाग घेऊन आपलीं मतें व्यक्त केलीं. या स्पर्धेमागील हेतु थोडासा स्पष्ट करणें मला येथें इष्ट वाटतें. वाचकांच्या विचाराला चालना द्यावी आणि क्रिकेटबद्दलची आजची प्रतिक्रिया अजमावावी हें प्रमुख प्रयोजन संपादकांच्या डोळयापुढें होतें. म्हणून त्यांनीं वरील आशयाचा लेख मुद्दाम लिहवून घेतला. तो लेख लिहिणाऱ्या लेखकाच्या मनांतहि क्रिकेटवर बंदी घालावी असे विचार नसतील सुद्धां ! तथापि आजच्या परिस्थितींत क्रिकेटबद्दलचे विचार प्रगट होणें आवश्यक वाटल्यावरून आणि क्रिकेटच्या हितचिंतकांना व विरोधकांना आपली तळमळ आणि मळमळ बाहेर टाकण्याची संधि द्यावी म्हणून त्या लेखांत क्रिकेटची एकच एक बाजू रंगविण्यांत आली.

असें असूनहि तिरंदाजाचीं सर्वच मतें अग्राह्य मानतां येणार नाहींत. त्यांतलीं कांहीं तर क्रिकेट-प्रेमिकाला खासच अंतर्मुख करावयास लावणारीं आहेत. विशेषतः जुन्या भारतीय क्रिकेटची आणि आजच्या क्रिकेटची केलेली तौलनिक चर्चा, तसेंच आजच्या कंटाळवाण्या खेळावर ओढलेले कोरडे, बोर्डातील अनास्था आणि खेळावर ओतलेल्या खर्चाच्या मानानें अगदींच नाममात्र असलेली प्रगति या तिरंदाजाच्या मताशीं सहमत न होणें कुणालाहि कठीण जाईल.

एकीकडे हे सामने तुफान गर्दी खेचीत आहेत, अमाप पैसा मिळवून देत आहेत आणि दुसरीकडे करमणूक न वाटतां सामने प्रेक्षकांना सहनशीलतेची शिक्षाच वाटत आहेत, ही वस्तुस्थिति आहे. क्रिकेटवर बंदी घालावी अशी भाषा आजहि सामने पाहणारे व न पाहणारे प्रच्छन्नरीत्या अथवा उघड बोलून दाखवत आहेत. अशा परिस्थितींत "दीपावली"च्या वाचकांचीं मतें कळावींत अशी









अनुक्रमणिका

इच्छा होती. वाचकांनीं स्वतंत्रपणें विचार करून तिरंदाजाचीं मतें कारणासहित खोडून काढावीं अशीं अपेक्षा होती.

वरील चढाओढीसाठीं आलेल्या उत्तरांत बहुसंख्यांकांनीं तिरंदाजाच्याच मताचा पुरस्कार केलेला आहे. क्रिकेटवर बंदी घालावी अशा मताचीच 'री' त्यांनीं ओढलेली आहे.

एक वाचक लिहितो– "प्रेक्षकांमध्यें बहिष्कारवृत्ति नाहीं. प्रेक्षकांनीं कंटाळवाण्या खेळावर बहिष्कार घातल्याशिवाय क्रिकेट सुधारणार नाहीं. प्रत्येक गोष्ट वाटाघाटीनें सोडवण्याचें लोण क्रिकेटमध्यें आलें असल्यामुळें पाहुण्यांना दुखवावयाचें नाहीं अशी आपली प्रवृत्ति झालेली आहे." क्रिकेटरांत वीरवृत्ति नाहीं आणि त्यांच्यांत कृतीचा अभाव आहे, असेंहि तो लेखक म्हणतो. दुसरा लेखक लिहितो– "सध्यांच्या आणिबाणीच्या काळांत राजरोसपणें चाललेली ही उधळपट्टी कायद्यानें तरी तूर्त बंद करावी. जी गोष्ट आपल्याला जमत नाहीं ती कबूल करण्यांतच मोठेपणा आहे." मात्र पुढें हा लेखक असेंहि म्हणतो कीं, "कायद्यानें बंदी येण्यापेक्षां क्रिकेटमंडळींनीं आपणहूनच थोडा काळ ड्रॉप घ्यावा अणि आपल्यांतील सुदैवानें जे दिगंत कीर्ति मिळवलेले खेळाडू आहेत त्यांच्या उत्कृष्ट दिग्दर्शनाखालीं घडाडीचे क्रिकेटपटू तयार करावेत–आणि मग येऊं दे कुठलाहि संघ, आम्हीं तयार आहोंत !"

आणखी एक स्पर्धक लिहितो– "क्रिकेटमुळें आपली मानहानी व आर्थिक हानीच जास्त झाली आहे. क्रिकेट हा खेळ लोकशाही भारताला परवडण्यासारखा नाहीं. पण हें सरकारला दिसलें पाहिजे. आज आपणांस श्रमाची जरुरी आहे. एकीकडे कारखान्यांत उत्पन्न वाढविण्यासाठीं रात्रपाळी चालते आणि दुसरीकडे लोकांच्या वेळेचा अपव्यय होतो. सर्व भारतीय यामुळें ऐंदी व आळशी बनतील व भारत आधींच आळशी म्हणून ओळखला जातो तो आणखी बनेल."

क्रिकेटवर बंदी घाला म्हणणाऱ्यांचीं हीं अशीं मतें आहेत. हीं मतें आपणांस एकांगी वाटत नाहींत काय ?

क्रिकेटवर बंदी घालूं नये असें प्रतिपादन करणारे जे स्पर्धक आहेत त्यांपैकीं एकानेंच फक्त तिरंदाजाचीं मतें खोडून काढण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. बाकी इतरांनीं क्रिकेटवर बंदी घालणें कसें अयोग्य आहे याचें फार जुजबी विवेचन केलेलें आहे. या पक्षाचा मुख्य मुद्दा असा कीं सध्यांच्या कंटाळवाण्या खेळांत आपल्याला खूप सुधारणा करतां येईल आणि क्रिकेटच्या खेळांत पुन्हां उत्साह निर्माण करतां येईल. तेव्हां निराश न होतां खेळ सुधारण्यासाठीं प्रयत्न केले पाहिजेत आणि नवीन रत्नें शोधलीं पाहिजेत.

या पक्षातर्फे जोरदारपणें बाजू मांडली आहे ती मुंबईच्या श्री. मनोहर राखे यांनीं. त्यांनीं अभिनिवेशानें क्रिकेटचें समर्थन केलेलें आहे. तिरंदाजाचीं मतें बरोबर नाहींत असें सांगतांना आणि क्रिकेट विषयक आपली तरफदारीची बाजू मांडतांना श्री. राखे यांचा सात्त्विक संताप किंचित् उफाळून वर आल्यासारखा दिसतो. श्री. राखे यांचा ढळलेला तोल लक्षांत घेऊनहि त्यांचीं कांहीं मतें विचारांत घेण्यासारखीं वाटतात. ते लिहितात– "क्रिकेटनें राष्ट्रीय संरक्षण निधीसाठीं बहुमोल मदत केली आहे. पूर्वीं कठीण परिस्थितींतही आपण खेळ बंद केला नाहीं– देशाच्या संरक्षण निधीस हातभार लावणारा खेळ बंद करणें ह्याला खात्रीनें कोणीही देशभक्ति म्हणणार नाहीं." क्रिकेटमुळें वेळ फुकट जातो–या आक्षेपास उत्तर देतांना ते लिहितात कीं मुंबईसारख्या शहरीं माणसांचे सिनेमा-नाटकांत किती तास फुकट जातात याचा हिशोब कुणी आंकडे शास्त्रज्ञानें काढला व त्या आधारें सिनेमा-नाटकांवरही बंदी घाला असें जर कुणी म्हणाला तर कोण काय बोलणार ? श्री राखे यांनीं आपल्या बऱ्याच विधानांच्या पुष्टयर्थ 'मोहिनी' मासिकांत प्रसिद्ध झालेल्या 'जिम पार्क्स'च्या मतांच्या आधार घेतलेला आहे. त्या अनुषंगानें श्री. राखे लिहितात "जलदगति गोलंदाज हवे असतील तर पीचेस् व इतर परिस्थिति अनुकूल हवी. क्रिकेटवर बंदी घालणें हा त्यावर उपाय नव्हे. आपण जलदगति गोलंदाज तयार करावेत. दर्जा खालावला तर तो सुधारावयाचा कीं तो खेळच बंद करायचा?

तेव्हां क्रिकेट बंद करणें म्हणजे चोर सोडून संन्याशाला फांशीं देण्यासारखें आहे.म्हणून क्रिकेटमधील राजकारण व अवास्तव खर्च कमी करावा. रोपटें चांगलें वाढावयाचें असेल तर त्याच्या खतपाण्याचा खर्च करावयास नको काय ? देशांत क्रिकेटचा खेळ बंद करण्याची एक टक्के सुद्धां जरुरी नाहीं. जरूर आहे ती फक्त जरा बदलत्या धोरणाची व चांगल्या पिचेसची."

हातीं आलेल्या स्पर्धा लेखांत मला श्री. मनोहर राखे यांचा लेख सर्वोत्तम वाटला आणि म्हणून माझ्या मतें तेच या चढाओढींतील विजयी लेखक ठरतात. त्यांचें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों.

या चढाओढीचा निर्णय देण्याचें काम संपादकांनीं माझ्या वर सोंपविलें होते. प्रस्तुत वादग्रस्त प्रश्नासंबंधीं माझीं मतें या ठिकाणीं देणें अस्थानी ठरेल. म्हणून येथें मी स्पर्धालेखांचा आढावा घेण्याचेंच काम तेवढें केलेलें आहे. "क्रिकेटवर बंदी घालूं नये" याच मताचा मी असून त्यासंबंधीं विस्तार करावयाचा झाल्यास एक स्वतंत्र लेखच होईल.

विशेष आनंद वाटतो तो हा कीं "दीपावली"च्या या स्पर्धेत मुंबईकरांनीं तर भाग घेतलाच पण बिहार मधील रांची सारख्या दूरच्या गांवांतील वाचकांनीहि त्यांत भाग घेतला. भाग घेतलेल्या सर्वांना तिरंदाजाचा लेख विचारात्मक वाटला. एकानें तर लिहिलें आहे कीं "तो लेख अतिशय आवडला कारण आमच्या मनांत घोळत असलेल्या या विषयाला आपण एकप्रकारें वाचाच फोडली."

क्रिकेट सध्यां चौरस्त्यावर उभें आहे. तें योग्य दिशेला जाईल किंवा नाहीं अशी साधार शंका कित्येकांच्या मनांत आज निर्माण झाली आहे. क्रिकेटविषयीं निर्लेप मनानें विचार करण्याची आज जरुरी निर्माण झाली आहे. अशा वेळेला संपादकांनीं या प्रश्नाचें महत्त्व ओळखून वाचकांच्या व क्रिकेटरसिकांच्या विचारशक्तीला जें आवाहन केले त्याबद्दल बहुसंख्य वाचकांप्रमाणेंच मीही संपादकांना धन्यवाद देतों. मात्र अशा स्पर्धेत यापेक्षां अधिक वाचकांनी भाग घेणें इष्ट आहे, असेंहि सुचवितों.

•••




*....वंड्याला बोलतां आलं असतं तर ?....*
*मीं त्याला विचारलं असतं,*
*"वंड्या, तुझं लक्षण ठीक नाहीं दिसत आज ?"*
*"पण तें ज्याचं त्याचं खाजगी रहस्य असतं....*
*मी बोका असलों म्हणून काय झालं ?"*
*त्या टळटळीत दुपारीं तो सारखा शेजारच्या घराच्या*
*कोपऱ्याकडे कां धांव घेत होता ?....*

—प्रभाकर नेरूरकर



**दुपारचे** तीन वाजले आहेत. खेड्यांतील दुपार. सारं कसं सामसूम आहे. घरांत कुणीच जागतांना दिसत नाहीं. सारीं झोपीं गेली आहेत. आशा आणि शुभा पण आजीच्या कुशींत झोपल्या आहेत. मी एकटाच माझ्या खोलींत समोर टेबल घेऊन खुर्चीवर बसलों आहे. दोन चार इंग्रजी पुस्तकं माझ्या टेबलावर पडलीं आहेत. पत्त्यांचा एक पॅक पण आहे. अधून मधून मी पुस्तकं चाळतों. कधीं कांहीं पानं वाचतों. कधीं टेबलावर पत्ते मांडतो—पेशन्सचा डाव खेळत बसतों. खोलीच्या खिडकींतून मला आमच्या शेजारणीच्या घराचा कोपरा तेवढाच दिसतो. त्या घराच्या भिंती मातीच्या आहेत. त्यांच्या वरचा तांवडा रंग केव्हांच उडून गेला आहे. मातींत कालवलेले दगड, धोंडे, गवती काड्या खसखसून उठून दिसताहेत. एका दगडी गडग्यानं तिचं व आमचं परसू वेगवेगळं केलं आहे. ऊन कसं रणरण करीत आहे. झाडाचं पान हालत नाहीं. ग्रीष्मऋतूचा मध्यकाल चालूं आहे. वडील बाहेरच्या आरामखुर्चीत बसून घोरत आहेत. त्यांना पेपर वाचतां वाचतां झोप लागली आहे. वळईत आई पण डाळकुटावर पडल्या पडल्या झोपेंत मग्न झाली आहे. तिचं तेंच झालं आहे. तिच्या उशाजवळ अर्धं उघडलेलं, पानं चुरगळलेलं, कथांचं पुस्तक पडलेलं आहे. मी एक फेरी घरांत मारतों व पुन: खोलींत येऊन खुर्चीवर बसतों. पुन: माझं लक्ष समोरच्या शेजारणीच्या घराच्या कोपऱ्याकडे जातं. मग तें गडग्यावर रेंगाळतं. मग पुन: तें पुस्तकांत डोकावतं. नंतर हात पत्त्याकडे जातात व पेशन्सचा डाव टेबलावर मांडला जातो. दूरवर नांगरून टाकलेले शेतांचे कुणगे दिसतात. उन्हाच्या झळा मातीतून झळकत असतात. कुठं कुणाची कसलीच चाहूल ऐकूं येत नाहीं. सारं कसं भग्न अन् भकास भासतं आहे...

आणि इतक्यांत समोरच्या गडग्यावर कुणाची तरी चाहूल मला जाणवते. मी टंवकारून पहातों. आमचा वंड्या बोक्या पावलं जपून टाकीत कुठंतरी चालला आहे. मध्येंच तो थांवतो. मागे वळून पहातो. 'म्यॅव' करतो. पुन: चालूं लागतो.

'वंड्याऽऽ...'मी खिडकींतून त्याला हळूच हांक मारतों.

'मियाँव...'तो माझा आवाज ओळखतो..

पुन: एकदां मी त्याला हांक मारतों.

'वंड्या

'मि याँ व' वंड्या थवकत प्रतिसाद देतो. पण वंड्याला माझी आगंतुक लुडबूड नकोशी वाटते. तो झपाझप चालतो. मग अलगद पायावर शेजारणीच्या भिंतीवर उडी मारून वर वर चढतो. त्याच्या नखांनीं खुरडलेल्या भिंतींच्या मातीची खरखर मला ऐकूं येते

माझ्या अंगावर कांटा उभा राहतो. बंड्याचे हे आणि अशा प्रकारचे चाळे मी नेहमींच पहातों. बंड्या हा आमच्या घरांत वनी मांजरीच्या पोटीं जन्माला आला. पांच वर्षं उलटून गेलीं आहेत. कसा गब्दूल दिसतो बंड्या. वाघासारखे काळे पट्टे त्याच्या पुष्ट देहावर शोभून दिसतात. त्याची गर्दन पण रुबाबदार आणि रौद्र आहे. त्याच्या 'मि यॅ व'-मध्यें पौरुषाचा मस्तवालपणा आणि जरब आहे. बंड्याला सर्वांनीं लाडांत वागविलं आहे.

बंड्या 'म्यॅं व म्यॅं व' करीत त्या घराच्या कोपऱ्याची भिंत अर्धीअधिक चढून गेला आहे. मात्र तिथेंच तो थबकला आहे. मान वळवून वळवून तो खालीं, सभोंवार, वर आणि कधीं माझ्याकडे पहात आहे. मी ऐसपैस माझे पाय टेबलावर पसरले आहेत. हात छातीकडे दुडून घेतले आहेत. मला वंडूची मोठी मजा वाटते आहे—त्या भिंतीच्या कोपऱ्यांत ओसरीला धरून बांधलेलं एक राखेचं कुंड असतं – तिथं माणसाच्या कमरेइतकी विवत सांचून राहिली आहे. आणि बंड्याला त्या कुंडांतच उडी घ्यायची आहे असं मी अनुमान काढतों.

बंड्याचं पोट तुडुंब भरलेलं आहे. त्याच्या तपकिरी पांढऱ्या देहावर तुकतुकीतपणा आला आहे. बंड्याची शेपटी सारखी लव-लवते आहे. आणि अजून त्याच्या मनाचा निर्णय झालेला दिसत नाहीं. मी पुनः एकदां बंड्याला प्रेमळ हांक मारतों. पण तो कंटाळून माझ्याकडे पहातो. जणूं त्याला म्हणायचं असतं ...'तुझं तूं पहाना.. मला का उगीच छळतोस?......"

मी बंड्यावरचं माझं लक्ष काढून घेतों. पुनः डोकं पुस्तकांत खुपसतों. खोलींत मला अगदीं करमेनासें होतें. घरांत पुनः एकदां मी फेरी मारून येतों. चुलघरांत वनी आणि तिची पिल्लावळ शांतपणानं डुलक्या घेत असतात. चारपर्यंत तरी न उठण्याचा सर्वांचा नित्यक्रम असतो. मी कंटाळतों. खोलींत जातों. शेजारणीच्या घराच्या कोपऱ्या-वर पहात बसतों. बंडोबा केव्हांतरी तिथून निसटलेला असतो. विबतीच्या कुंडांत कांहीं हालचाल दिसते कां म्हणून मी खिडकींत उभा राहून न्याहाळतों. गडग्यावर पण कुणाची कसलीच चाहूल नसते. पेशन्सचा डाव पुनः पुनः मी नव्यानें मांडतों. माझें कुठेंच लक्ष लागत नाहीं.

आणि तरीहि माझें लक्ष वाहेर बंड्याच्या हालचालींत गुंतलेलं असतं. वंडू दिसत नाहीं पण जाणवतो. विबतीचं कुंड अजून थंड असतं. पेळेकड्चा शेगूल पण थंड थंड असतो. त्याच्या हिरव्या चुटुक पानांची मला मोठी गंमत वाटते. जरा वारा यावा, शेगूल हलावा असं वाटतं. पण वाराच कुठं नसतो. ऊन रणरणत असतं. खेड्यांतील ही दुपार—खायला येणारी — नकोशी वाटते. खुर्चीवर बसावसं वाटत नाहीं. घरांत जाण्याची सोय नाहीं. बाहेर सारं कसं थंड थंड तरी पण किती गरम, ऊष्ण पोळणारं ! 'आशाला उठवूं कां?..' माझ्या मनांत एक बेत आकारतो. मग शुभा पण उठेल. घराला त्यामुळें जाग येईल. वातावरण हंसरं खेळतं होईल. चहाची वेळ होईपर्यंत थांबायचं म्हणजे अजून तास दीड तास थांबलं पाहिजे...मे महिन्याचे दिवस आहेत....

मी पुनः खुर्चीवर येऊन ठामपणें बसतों. पुनः पत्ते मांडतों. बंड्याच्या थंड हालचाली बाहेर चालूच आहेत याचा कानोसा मी घेतों. हा बंड्या ! मला त्याचा क्षणभर हेवा वाटतो. त्याची मस्ती, त्याचा मुक्त-विहार, त्याची आत्मसंतुष्टि..मी कल्पनेनें मग त्याची जागा घेतों व माझी त्याला देतों. बंड्या खुर्चीत येऊन ऐसपैस बसला आहे. त्याची शेपटी खुर्चीच्या मागील फटींतून लोंबते आहे ऐटींत..समोर टेबलावर आपल्या पुढच्या दोन पंजांनीं बंड्या पत्त्याचीं पानें मांडतो आहे....मधून मधून पुस्तक चाळतो आहे. शीळ घालतो. जांभई देतो. खिडकींतून बाहेर पहातो...मला छुत् छुत् करतो....

इतक्यांत खिडकींतून वाऱ्याची झुळूक येते. पत्त्याचीं पानें फडफडत जमिनीवर पडतात. माझी तंद्री उतरते. मी पानें गोळा करतों. पुनः मांडतों. आतां काय करावें हेंच मला सुचेनासें होतें. तरी पण खुर्चीचे हात घट्ट धरून मी तिथेंच बसून राहतों. मे महिन्याची सुट्टी नकोशी वाटूं लागते मला. कंटाळा..अगदीं कंटाळा आलेला आहे.. म्हणे खेड्यांत चला ! ...एक तप होऊन गेलं मला आतां खेड्यांत येऊन. स्वतःच्या जन्म-ग्रामीं. दिवस जातां जात नाहींत. हा असा कंटाळा ! ही पोकळी! काळ पळतो हें खरंच वाटतं नाहीं इथें...गांवाचा चव्हाटा हांकेच्या अंतरावर आहे. तिथें जाईन तर वेळ जाईल खरा. ग्रामपंचायतीच्या कचेरींत बसायचं. सरपंच फार भला गृहस्थ आहे. फार भाव देतो मला. चहाचीं हॉटेलें आहेत... मासळी बाजार आहे. लोकांची आवक जावक आहे.... पिंपळाचा पार आहे-मारुतीचं देऊळ आहे... पण तिथें जावंसं वाटत नाहीं. तिथल्या गांवठी राजकारणाला तंत्र नसतं. ताळ नसतो. आपल्या पांढरपेशा बुद्धिजीवी जीवनाशीं कांहीं त्याचा मेळ जमत नाहीं..त्यापेक्षां हें आपलं खोलींत डांबून व पुस्तकांत डुंबून राहणं बरं वाटतं...कुणीच कशी अजून उठत नाहींत ? आज सर्वांच्या झोपण्याचा अगदीं कहर झाला आहे..आतां मात्र दिवस जरा कलल्यासारखा वाटतो आहे. वारा वाहतो आहे. मंद - मंद..पेळेकड्चा शेगूल किंचित डोलूं लागला आहे... साऱ्याच निस्तब्धतेचा भंग करण्यासाठीं मीच ओरडतों. खिडकींतून..विबतीच्या कुंडाकडे दृष्टि रोखीत.. बंडूची कुठेंच कांहीच चाहूल कशी येत नाहीं!

मी साद घालतों...'बंडू....बंडू.....'

पुनः...'बंड्या...बंड्या...बंऽड्याऽऽबंऽऽड्याऽ.'.. सारं चिडीचूप. बंड्या असलाच विबतींत तर गपचुप पडून असेल.

मी गप्प राहातों. माझाच आवाज मला खातो. नकोसा होतो. वंडूवर मघांपासून माझी मोठी भिस्त होती. शेजारणीच्या घराचा कोपरा आहे तसाच भकासपणें ओक्याबोका उभा आहे. विबतीचं कुंड तिथंच आणि तसंच सारखं डोळ्यांत भरतं आहे.

'मियँ व..मियँ व...'

'मियँ व...मियँ व..'

मी चपापतों. हा बंडूचा आवाज. पण मघापेक्षां अगदीं निराळा. अगदींच वेगळा. माझ्याच खोलींतून आल्यासारखा वाटला. अगदीं जवळून. शेजारणीच्या कोपऱ्यावर सामसूम होतं. मी बिचकून वर पाहिलं. होय.









खोलीच्या भिंतीतील कोनवाशाच्या कोनाड्यांत वंडूची मान, तोंड, डोळे आणि आक्रस्ताळी उघडलेला जबडा तेवढा दिसत होता. वंड्या हळुहळू पुढें पुढें सरकत होता कधीं वंड्या तिथं आला हें मला कळलं पण नाहीं..अरे चोरा वंड्या !.........

'वं ऽ ऽड्या.....' मीं एका लयींत पण खेचून हांक मारली. वंडूच्या चेहऱ्यावरचे भाव विलक्षण निराशेचे होते. संताप पण त्याच्या डोळ्यांत उग्रपणें सांठलेला होता. वंडू एकूण आपल्याच कोणत्या तरी उध्वस्त 'मूड' मध्यें दिसत होता. एवढ्यांत अख्खा वंड्या भिंतीवर स्थिर उभा राहिला. क्षणभर त्यानें माझ्याकडे परकेपणानं रोखून पाहिलं. त्याची शेपटी वर खालीं होत कोनवाशाला घाशीत होती. त्याच्या थरथरणाऱ्या मिशा फेंदारल्या होत्या. वंडू जसा नेहमींचा वंडू नव्हता तसाच मी पण मघांचा 'मी' नव्हतों. वातावरणांत एकदम बदल झाल्यासारखा मला उमेदीनं वाटूं लागलं..माझं पत्त्यावरचं लक्ष उडालं. खिडकीकडं पाठ करून मी उभा राहिलों..वंड्याला बोलता आलं असतं तर ? मी त्याला कळवळून विचारलं असतं.

'वंड्या, नीट जरा बघ ना माझ्याकडे.'

मग बोलका वंड्या कदाचित् तुसडेपणानं उत्तरला असता,

'अहो मालक, कशाला आम्हां आश्रितांना छळतां ?'

'म्हणजे रे काय ?..' मी.

'ज्याचं त्यानं पहावं;...वंड्या.

'कां पण ?...तुझं लक्षण ठीक नाहीं दिसत आज.....

'खरं आहे.....

'होय ना !....

'पण तें ज्याचं त्याचं खासगी रहस्य असतं मी बोका असलों म्हणून काय झालं?..'

'रहस्य...?'

आणि वंडूचं पण रहस्य आहे या कल्पनेनं मी पोट धरधरून हंसत सुटलों असतों. वंडूचं आजचं दर्शन तसंच होतं. कांहींतरी बेटयाचं रहस्य असावं आणि त्याचा गौप्यस्फोट झाला असावा... मीं पुन: वंड्याला एक प्रेमळ आवाहन केलं. टेबलावर उभा राहून त्याला अलगद धरावा व नेहमींप्रमाणें कुशींत घ्यावा आवळून म्हणून मी खरंच टेबलावर चढून उभा राहतों. पण वंड्या पुढची मान खसकन् मागें घेतो, तोंड वळवतो आणि मला आपला पार्श्वभाग दाखवींत व जणू शेपटीनें 'वाय वाय' करीत चपळाईने निघून जातो. तो आतां बाहेरून आमच्या खोलीच्या कोपऱ्यावरून खालीं उतरत असावा. त्याच्या नखांची मस्तकांत भरणारी व शिरशिरी आणणारी खरखर मला आंत ऐकूं येते.

मी खिडकींतून डोकावून पहातों. वंडू ओसरीवर उतरलेला असतो. तिथून समोरच तो गडग्यावर उडी घेतो. अलगद चार पायांवर सांवरून बावरून उभा राहतो. आणखी एक उडी तो मोजून मापून घेतो आणि शेजारणीच्या घराच्या कोपऱ्यांतील विवतीच्या कोनाड्यांत क्षणभर विसांवून सरसर भिंत चढूं लागतो. चढतां चढतां थांबून तो असं कांहीं करुण कोमल ओरडतो कीं तें क्षणिक अशुभ वाटतं; अन् तितकंच केविलवाणं पण वाटतं.

'वंडू...ऽऽ वंऽऽड्या...' मी एकदांचा आकांतानें ओरडतों.

वंडू माझ्याकडे पहात सुद्धां नाहीं. निर्विकार तटस्थपणें आणि तरीहि कमालीचा विकारवश होत वंड्या भिंत चढून शेजारणीच्या घराच्या कोपऱ्यांत कुठें गडप झालेला असतो.

इथं चटकन् मला आठवतं कीं आमची शेजारीण आज शेजारी नाहीं आहे. आमच्या शेजारणीचं असंच असतं...ताईचं ! ताई घरांत असती तर दुपार इतकी ओकीबोकी गेली नसती. तिची जाग मोठी असते. तीनचारदां एव्हांना ती त्या विवतीच्या कुंडांत मुठीनें विवत नेण्यासाठीं किंवा सुपांतून आणून विवत त्या कुंडांत टाकण्यासाठीं आली असती. खांकरली असती. खोकत उभी राहिली असती. तांब्याभर पाणी घेऊन चुळा टाकीत असती. त्या एवढ्या मोठ्या घरांत ती एकटीच रहाते कित्येक वर्षें ! नवरा गेल्यापासून... केंस पिकलेले. साठी उलटून गेलेली...मुलं हातीं तोंडी येऊन सर्व अकालीं मृत झालेलीं... आणि तरी ताई कधीं कुढत नाहीं बसली. मोठी रंगेल, गंमतीं, खेळकर... तिनं एव्हांना मला तीन चारदां तरी हांका मारल्या असत्या.. म्हटलं असतं...

'काय रे...काय करतोस ?...'

'वाचतोय् 'ताई'... मी म्हटलं असतं...




'वाच बाबा.. खूप वाच... विद्वान हो'... मी फार मोठा विद्वान आहे अशी तिची प्रामाणिक समजूत आहे. माझं कौतुक ती सर्वांना बोलून पण दाखविते.

—आणि आत्तां मला आठवतं.. ताईची एक मांजर आहे. गुबगुबीत, करड्या रंगाची, मस्त अन् मुजोरी.. वयांत आलेली..

'वंड्या..... कळलं हं तुझं रहस्य मला...' असं मला ओरडून वंड्याला सांगावंसं वाटतं. पण वंड्या कुठें दखल घेतो माझी. मी पुन: माझ्या खिडकींतून बराच खालीं वाकून वर तोंड करून, दृष्टि शेजारणीच्या घराच्या कोपऱ्याच्या कोनवाशांत रोखून कांहीं तपशील हाताला मिळतो कां पहातों.. ओ ! हो !.. दिसतं मला बरंचसं कांहीं दिसतं.. आणि दिसत पण तसं कांहींच नाही.. दोन शेपट्या खालीं भिंतीवर लोळतांना दिसतात. एक शेपटी कधीं दुसरींत जाते; दुसरी पहिलीशीं लाडीगोडी करते.. दोन रंगाच्या दोन शेपट्या... बाकी सारं सामसूम आहे. मात्र पेळेवरचा शेगूल डोलतो आहे. खिडकींतून येणारा झुळझुळु वारा अंगाला स्पर्श करतो आहे. सांज जाणवूं लागली आहे. कंटाळा कंटाळा वाटेनासा झाला आहे. घरांत पण गडबड सुरू झाली आहे... कपबशांचं संगीत कानावर येतं आहे. वडिलांनीं बाहेर आरामखुर्चींत मोठी जांभई नेहमींच्या पद्धतीनें दिली आहे आणि आशा कीं शुभा चुलीकडे आजीला कांहींतरी सांगताहेत... मी अजून वांकवांकून पहात खिडकींतच... उभा म्हणू कीं बसलेला... वंडूचं कर्तूत पहातों आहें.. पत्ते माझ्याच हातांनीं सर्वत्र विखुरले गेले आहेत... पुस्तकांचीं पानें फडफडताहेत.. कोपऱ्याला कोपरा भिडला आहे.. कोपऱ्यानें कोपरा गिळला आहे..असं मला आपलं वाटतच रहातं.. वंडूला हांक मारायची नाहीं असं मी ठरवतों... आणि मऊ मऊ, गोड, गुबगुबीत, कण्हल्यासारखी 'मियॅंव' माझ्या कानीं येते.

●●●









~~~ ४४ ~~

माझ्या कथासूत्र :

गांवांत कंपनी आली होती. अण्णा गुरुजींचा भाचा विजय तिचा असिस्टंट मॅनेजर. दाजी नाबरांची मुलगी त्याच्यावर प्रेम करूं लागते. पण एके दिवशीं त्याच्या जातीचा उल्लेख तिनें बोलण्यांत करतांच तो तिच्याकडे पाठ फिरवतो.... खाणींत कामाला लागलेल्या घाटी लोकांना देण्यांत येणारी वागणूक पाहून तो आधींच व्यथित झालेला असतो. गांवानं माणुसकी सोडली होती. रात्रीं अंग टाकण्या-पुरती जागा देऊन गांवांतले लोक पठाणा-सारखं भाडं वसूल करीत. घागरभर पाण्याची किंमत होती एक एक आणा. हें सर्व बघून तो विलक्षण खिन्न होतो... अन् त्यांत हें प्रेम-भंगाचं दुःख..... ...पण हाहि धक्का कांहींच नाहीं असं म्हणायची पाळी त्याच्यावर येते. माणसांतलं जनावर जागं झाल्यावर ?.....

—श्रीराम कामत



१९

**रामप्पा** शेट्टीचा एक दोस्त होता. नांव होतं जीवनसिंग. लोकं म्हणत—शेट्टीचं शिंग आणि पिऊन झिंग. खरंच ! बघावं तेव्हां हा सिंग दारू पिऊन आपला झिंगलेला असे. कंपनीतच तो एक मेस्त होता. धर्मानं शीख. आतां हा धर्मसुद्धां गांवांत कोणाला माहीत नव्हता. तेव्हां तीं ह्याला म्हणत सिक. आणि तेंहि खोटं नव्हतं. ह्याच्या जटा अन् दाढीमिशा सदा वाढलेल्या, अंगांत जीर्ण, विटलेला सद्रा, डोळे इंगळ्यासारखे लाल. एखाद्या वेडसर माणसासारखा तो दिसे. आणि वागायचा पण असाच. पिराच्या वकऱ्यासारखा. सुस्त, संथ. लोकांचा तर्क— सिक माणूस. डोक्यांत विघाड असावा !

एकदिवस रविवारला हा सिंग एकाएकीं बिघडला. पिऊन पार बेफाम झाला. वस्त्याव रिव्रस्तावाच्या पडवींतच दंगल मांडून राहिला. नवटाक दारू, अच्छेर मस्ती अशी धमाल उडवून दिली.

वस्त्यावला कटकट नको होती. मात वडवायची काठी उचलून तो अंगावर आला. ओरडला, "मेस्ता, वाहेर पड. वाटेला लाग पहिला."

रिव्रस्तावाचं मत दुनियेंत भाषा एक. तो बोलतो तीच. निदान दारूच्या तारेंत तरी प्रत्येकाला ती कळायला हवी.

पण गिऱ्हाइकांपैकीं कुणींसं म्हटलं, "वस्त्यावा, अरे तुझी भाषा ह्या अर्धवटाला कळत नाहीं."

वस्त्याव अधीक हुज्जत घालीत वसला नाहींच. गचांडी देऊन सिंगाला त्यानं वाहेर काढलं. आणि मोठ्यानं हंसत वाकीच्यांना म्हटलं, "माझी भाषा येत नाहीं ? आं ! दारू वाकी पितां येते मायच्याला."

रस्त्यावरून सिंग दमदाटी करूं लागला, "हां ! चला मैं ! पोलीसको लावूंगा।"

रिव्रस्ताव ओरडला, "जा मर. पड जाऊन त्या कंपनीच्या खाणींत."

"पोलीसको बोलूंगा, यहां दारू मिलती है। पकडो ऊस वद-मायको !"

"माहीत आहे रे पोलिसांना. खुद्द पोलीसपाटीलच चक्कर मारून जातो रोज. रोजची दहाची एक अख्खी नोट. काय ? शिवाय दारू—काय पिईल ती." माहीतगारांपैकीं एक म्हणाला.

तसे सगळेच मोठ्यानं हंसले.

वस्त्यावनं मात्र दटावलं, "ही अशी बोंब मारीत वसा तुम्ही. आन् मग तो मायचा पाटील हप्ता वाढव म्हणतो."

हा रामप्पा वरोबर नसला कीं गांवांत आपले हाल कुत्रादेखील खाणार नाहीं हा अनुभव सिंगाला आज ठिकठिकाणीं येत होता.

एक आण्याचीं भजीं देण्यावद्दल हॉटेलवाल्याला त्यानं ऑर्डर दिलीं तर त्या वद्‌तमीस राघल्या कृष्णानं आधीं आण्याची मागणी केली. ओळखीच्या पानवाल्याकडे लवंगासाठीं हात पसरला तर त्यानं थप्पड दिली.

सावित्रीवाईच्या 'खास भंडारी पद्धतीच्या झणझणीत आणि घरगुती बनावटी'च्या खाणावळीसमोर 'वाय, वाय' करीत वराच वेळ तो उभा होता. लटपटत्या पायांनीं, झोकांड्या खात.






~~~

खाणावळ नांवाला. खरा धंदा दुसराच चाले.

म्हणूनच रामप्पानं नुसती साद घालायची खोटी. नाहीं तिथून, असेल त्या स्थितींत सावित्री लगबग धांवायची. कांचोळी असलीच तर गांठ घालत, नसली तर छातीवर नुसता पदर ओढत. अंगांतून तरी दोनचार ठिकाणीं मोडत ती येई.

हाताला धरून रामप्पानं तिला सरळ ओढावं. म्हणावं, "चल, आव. टाईम बिलकुल नाहीं. साला तो शेट आला कीं म्हणशील आतां दार बंद."

"अरे, पण माझं गिऱ्हाइक —" ओठावरून जीभ फिरवीत सावित्रीनं विचारावं.

"गेलं खड्ड्यांत ! आहेत ह्या दुसऱ्या रांडा—"

तसं नाक उडवीत सावित्री म्हणे, "त्या नकोत ह्यांना. त्यांचा पैसा नाहीं वसूल होत. मीच हवी."

"बदमाश ! सिधा कहूंगा !" मुंबईच्या दादानं धमकी द्यावी. बाकड्या डोळ्यानं आंतील गर्दीकडे बघावं. गांवांतलींच पोरं. खाणीवर कामाला असणारीं. आपण आतां बाप्ये झालोंत, बायांकडे जाऊं लागलोंत– ह्या कल्पनेंत तीं खुश असत.

दोन्हीं हातांनीं सावित्रीला उचलून त्यांना तो म्हणे, "आहे हिंमत पोरांनो, तर या आणि सोडवा हिला. नाहीतर बसा नंबर लावून."

पोरं ह्या रामप्पाला ओळखून होतीं. काय बिशाद तीं पुढं येतात? फिदीफिदी हंसत चुप्प बसत. सावित्रीच्या शरीराशीं सलगी करीत रामप्पा तिला आंत दाराकडे ओढायचा. दार लावून घेतांना सावित्रीचं लक्ष सिंगाकडे जायचं. अंगावर काटा आणून तिनं विचारावं, "अरे पण हें तुझं अस्वल–त्याचं काय ?"

"टाक चार पापड. बसेल खात"

सावित्रीची पोर शकू सिंगाच्या हातावर चार पापड टाकी. अणि ते खात तो ओसरीवर बसून राही. बघत बसे–ह्या शकूकडेच. जड पेंगुळल्या डोळ्यांनीं. दाढी खाजवीत. उसासत, धापा टाकीत. जशी ती पोर खरी नव्हती. त्याचं स्वप्न होतं. आणि मग मेस्त तंद्रींत पडे. त्याचे ओठ हंसूं लागत. आपल्या भाषेंत तो एखादं गाणं गुणगुणत राही. कुणाचं लक्ष नाहींसं बघून एखाद दिवस शकूला चोरून हळूच हात लावी. तिनं दचकून अंग काढलं कीं मग हंसत सुटे. फसफसून, आधाण उकळतं तसा. असा चक्रम होता बेटा ! वर म्हणे कसा, "छोकरी अच्छी है ! मुझे अच्छी लगती !"....

सावित्रीला हुकमी साद घालायला रामप्पा आज त्याच्याबरोबर नव्हता. आणि एका मामुली मेस्ताकडे लक्ष द्यायला सावित्रीला सवड नव्हती. तशांत ह्या बेडपटाला पापड द्यायला तिची लेक शकूसुद्धां घरांत नव्हती. शेरडूं चारायला ती वर रानांत गेली होती.

ही नसती ब्याद दारांत ओरडत उभी असलेली सावित्रीच्या गिऱ्हाइकांना खपली नाहीं. ओसरीवर आधींच इतका गलका होता कीं डोकं उठून जावं. असंच डोकं उठलेला एकजण तडकला, "कां रे कटकट करतोस ?"

"तुम कौन पुछनेवाला जी ?" सिंग डोळे वटारून बोलला.

"तुझा बाप!" त्या इसमानं जाब केला.

"मैं नहीं जानता !"

"कैसा जानेगा रे ? साला होयेगा पण नहीं !" आणखी एकानं म्हटलं. त्याला थोडंफार हिंदी येत होतं. "मांको पुछ, जा !"

आणि तसा एकच हंशा पिकला.

मग मात्र सिंग पुरता बिथरला. मुठी उगारून ओरडला, "मांका नाम मत लो—"

"भांचोद क्या करेगा रे मेस्ता ?" तीनचार पोरं कपाळावरचे केस झटकत एकदम गुरगुरून आलीं. बरोबर होतं. रामप्पा नव्हता. तेव्हां ह्यांच्या पराक्रमाला आज वाव होता.

तीं कोण न् काय हें बघायला कांहीं सिंग थांबला नाहीं. डोळे गरांगरां फिरवीत तसाच उड्या टाकीत तो धांवला. ओसरीवर चढून दिसेल त्याला गुद्दे मारीत सुटला. तोंडानं गर्जना चाललीच होती, "जान निकलूंगा ! शीख हूं मैं, सरदार हूं ! हां !"

जाम कालवा झाला. हाकाटी उठली. खाडकन् दार उघडून सावित्री फणफणत बाहेर आली. आणि मागून तिचा जोडीदार. इतर लोकांचा पण विरस झाला होता. एक एक तीं बाहेर धांवलीं.

एव्हांना सिंगाला बाहेरच्या लोकांनीं गराडा दिला होता. नाहीं-तरी इतक्या माणसांपुढं एकट्याचा निभाव लागणं कठिणच ! चारीकडून बेट्याला मार बसत होता. पण माघार घ्यायला तो तयार नव्हता. पडला तरी तो उठत होता. लोळला तरी उसळत होता. लाथाबुक्के खात होता. पण बकवा असा चालवला होता न् कीं वाटावं हाच लोकांचा समाचार घेतो आहे.

"अरे खूप झाला रे तुमचा पराक्रम ! आणीक काय मुडदा पाडणार त्याचा ? तसं असेल. तर व्हा बाहेर—" असं ओरडत सावित्री मध्यं पडली. हाताला धरून लोकांना तिनं बाजूला केलं. आणि कंपनीच्या ह्या मेस्ताला सोडवलं, वांचवलं.

बाहेर बघ्यांची एकच गर्दी जमली होती. रस्ता अडवून लोकं उभीं होतीं. कंपनीचा एक ट्रक ह्या गर्दीत अडकून पडला होता. हार्न वाजवून ड्रायव्हर सारखा पुकारत होता, "बाजू– अरे बाजू तरी द्या !"

ह्या ड्रायव्हरला सावित्रीनं साद घातली. म्हटलं, "बाबा, रामप्पाचं हें जनावर पिसाळलं आहे हियं, माझ्या दारांत. ट्रकवर टाकून



जा घेऊन त्याला. त्या रामप्पाला म्हणावं, सावित्री होती म्हणून हा जगला. नाहींतर घडगत नव्हती."

ड्रायव्हर आणि बरोबरच्या चार घाटयांनीं मोठ्या शिकस्तीनं ह्या सिंगाला ट्रकवर चढवलं. ट्रक सुरू झाला. एक जोराचा गचका बसून मेस्त समोर कठड्याला दणकन् आदळला तरी त्याचा थय-थयाट चाललाच होता. पिसाळल्या कुत्र्यासारखा दांत काढून लाळ सांडत तो कचकचत होता, "ईस गांवमें सब लोक बदमाष हैं, चारसोंबीस हैं। आदमी रहतेही नहीं! खाली जानवर! पैंसेके वास्ते यहांके मर्द बूट चाटते हैं और औरतें नंगी होतीं हैं। कैसा गांव हैं जी! सैतानोंका—"

रस्त्यावरून आल्यागेल्याला ओरडून तो हें सांगत होता. त्याच्या मांच्या इज्जतीला कांहींतरी झालं होतं. आणि दारूपेक्षांही ही गोष्ट त्याच्या टाळक्यांत अधिक चढली होती. तो गप्प बसणं शक्य नव्हतं.

लोकं हंसून म्हणत, "मेस्ताला आज जास्त झालेली दिसते."

मेस्त हात उगारून जाब करी, "जान निकलूंगा तेरी, और तेरे औरत के साथ—"

ड्रायव्हर खोः खोः हंसायचा. बरोबरचे घाटी ह्या मेस्ताला आवरण्याचा प्रयत्न करायचे. त्याच्या तोंडावर हात ठेवायचे.

गांव मागं पडला. ट्रक रानांत चढावाला लागला. रहदारी विरघळूं लागली. तसं सिंगाच्या पोटांत मळमळूं लागलं. ओरड—ओरडून त्याचा टाळा सुकला होता. घशाला कोरड पडली होती. तो घामाघुम झाला होता. ट्रकच्या कठड्याला कपाळ टेकून तो अंमळ स्वस्थ पडून राहिला. पण जिवाला बरं वाटेना. गुदमरल्या-सारखं जड जड वाटूं लागलं. ओय् ओय् करीत मेस्त खालीं बसला. वकावक ओकूं लागला. त्या घाणींतच हातपाय ताणून तो आडवा झाला. रडूं, कण्हूं लागला. हा असा— "जान निकलूंगा— तुम्हें नंगी करूंगा!"

ड्रायव्हरला घाटयांनीं म्हटलं, "दादा, मेस्ताला दारू बाधली बघा. पडला कीं ओकत."

"पोट वाढलं कीं वर येणारच! दारू काय किंवा पोर? आं" ड्रायव्हर बोलला. आणि वर मला हंसत सुटला.

कंपनीच्या हापिससमोर ट्रक उभा करीत ड्रायव्हर म्हणाला, "उचला आन् टाका मुड्याला. आपसुख येईल शुद्धीवर."

"दादा नाहीं. सावित्रीबायचा हुकूम ह्याला रामप्पाच्या स्वाधीन करा." एकजण म्हणाला.

"पण कुणी धुंडायचा रे रामप्पाला? तो असेल तिथं त्या रांडेकडेच."

"काय कीं! पण तीं काय— खोपाटं हो! पांच नंबरचं खोपाट ह्या रामप्पाचं बघा." घाटयांनीं माहिती दिली. कांहीं तशाच खास नोकरांना कंपनीनं हापीसजवळ घरं बांधून दिलीं होतीं.

फडफडत ड्रायव्हरनं ट्रक चालूं केला. हापीसला एक चक्कर मारून ट्रक पिछाडीला कंपनीच्या झोपड्यांच्या रोखानं घेतला.

आणि इतक्यांत वारा पिऊन चौखूर उधळलेलं एक शेरडूं ट्रकपुढं आलं. खालींच यायचं. ड्रायव्हरनं शिताफीनं ब्रेक लावले. अन् म्हणून बचलं.

ड्रायव्हर बरोबरच्यांना ओरडला, "बघतां रे काय?"

घाटयांनीं जाब केला, "शेरडूं दादा."

"रांडेच्यांनू, मग उड्या टाका, धरा त्याला. हातचं जाईल!"

"आं! पण कोणाचं नू काय?!"

"बाचं का असेना? टेस कमी होतेरे?" ट्रक थांबवून ड्रायव्हर खालीं उतरला.

तशा घाटयांनीहि उड्या टाकल्या. हाः हाः करीत सगळे शेर-डाच्या मागं लागले.

मागून शकू धांवत येत होतीच. ती ओरडली, "शेरडूं माझं आहे. धरूं नका., नका धरूं त्याला."

ड्रायव्हरच्या तोंडाला पाणी सुटलेलं. तो मिटक्या मारीत म्हणाला, "कंपनीच्या हद्दींत आलं. कंपनीचं झालं."

दाजी नावराचा कान्ता शकूची समजूत घालूं लागला, "काय विशाद धरतील! हात तरी लावूं दे. सांगतों काय तें." खरं म्हणजे चूक ह्याचीच. कान्ताच्या नादाला लागून शकू शेरडाला चारायला कंपनीच्या हद्दींत आली होती. शहाणपणानं तो पुढं म्हणाला, "कंपनी आम्ही जाणत नाहीं. ही गांवची हद्द आहे."

ड्रायव्हरनं त्याच्याकडे लक्षसुद्धां दिलं नाहीं. त्याचं लक्ष फक्त शेरडाकडे होतं. खालीं मान घालून उड्या मारीत तें त्याच्या रोखानं येत होतं. जवळ आलंसं बघून त्यानं झडप टाकली आणि मानेला अलगद पकडलं. शेरडूं बेंबेंटूं लागलं. तें बिल्कुल भ्यालं होतं. मान टाकून आणि पाय मोडून निपचित तें ड्रायव्हरच्या हातांत पडलं.

शकू किंचाळली, "मेल्या, सोड माझ्या शेरडाला! मरेल तें तुझ्या हातांत."

"नाहींतरी मारायचंच आहे कीं बकरं." एका घाटयानं खुलासा केला.

"नाहीं— नाहीं—" शकूनं गळा काढला. ती ड्रायव्हरच्या हाताशीं झोंबली. कडकडून चावली.

त्यानं एक जोराचा हिसका देऊन तिला बाजूला लोटलं. दम दिला, "मुकाट जातां का करूं थोबाड बंद?"

तसा कान्ता मागच्या मागं पळाला. दूर गेला आणि त्यानं आवाज चढवला, "शके, लक्ष ठेव. पळून जातील. मी गांवांत कळवतों. मग बघूं कोण कोणाचं थोबाड बंद करतो."

बरोबरच्यांना डोळा घातला आणि शेरडाला खांद्यावर टाकून ड्रायव्हरपण बाजूला रानांत वळला. तसे चार घाटीसुद्धां मागोमाग निघाले. रस्त्यांत उभ्या केलेल्या ट्रककडे किंवा आंत तर्र होऊन पडलेल्या मेस्ताकडे एकाचंहि लक्ष गेलं नाहीं.

ते चाललें होते— तिचं शेरडूं पळवून. आणि त्यांना कोणी अडवत नव्हतं! कोणी नाहीं! एव्हढी मोठी महामाया— शकूची बाया! केव्हांघर बायेला ती सांगणं करीत होती. 'हवातर माझा जीव घे. पण माझ्या शेरडाला सोडव बाये,' असं. रडत, डोळे चोळत. महा-मायेचा वाघ तिच्या शेरडाला सोडवायला धांवून येईल ह्या श्रद्धेनें इकडे तिकडे बघत ती उभी होती. पण कुठं काय? कांहीं नव्हतं, कोणीच नव्हतं. तिच्या शेरडाला घेऊन हे घाटी राक्षस चाललेच होते. त्यांच्या वाटेंत अरिष्ट येत नव्हतं— कांहीं नव्हतं.

तिनं वाट—वाट पाहिली. मग रहावेनाच. तेव्हा शकू त्यांच्या-मागं धांवली.






आणि तिचं लक्ष गेलं. मेस्त तिला दिसला. ट्रकमध्यं पडलेला. शकूला वाटलं — वाया पावली. तिनंच धाडला त्याला. तिचं शेरडूं सोडवायला.

"मेस्ता—" तिनं साद घातली.

तो नशेंत चिंब होता. वरळला, "जान निकलुंगा– नंगी करूंगा."

शकूनं हातपाय ओढून त्याला ढळवला, चिमटे घेऊन जागा केला.

"क्या–क्या–क्या है ? आं ! छोकरी तुम् ?" मेस्ताची नशा एकदम उडाली. विजेचा धक्का लागावा तसा तो हादरून उठला. टुणकन् उडी टाकून खालीं उतरला. शकूनं त्याला मिठीच मारली. बापाला बिलगते तशी बिलगली. सिंगाच्या कुशींत मान खुपसून स्फुंदून स्फुंदून ती रडूं लागली. हुंदके देत सांगूं लागली, "धाडला तुला बायेनं. होय ! जा, माझं शेरडूं सोडवून आण. मेल्या घाटयांनीं धरून नेलं रे. राक्षस मारून खाणार माझं शेरडूं. मेस्ता– मेस्ता– अरे मेस्ता."

सिंगाला शकूचं बोलणं कळलं नव्हतं. आणि तरीहि तिला तो कुरवाळीत होता, मिठींत जवळ न् जवळ ओढीत होता. रक्त थिजल्यासारखा त्याचा चेहरा पांढराफटक पडला होता. श्वास जड झाला होता. हात थरथरत शकूच्या अंगावरून नको तिथं फिरत होते.

म्हणजे आठवर्षाच्या पोरीलादेखील तें कसंसंच वाटलं. चमत्कारिक, चोरल्यासारखा. दचकून शकूनं त्याच्याकडे पाहिलं. विचारलं, "मेस्ता, असं काय करतोस रे ?"

"क्या– क्या–?"

"डोळे असे कसे दिसतात तुझे ? बरे नाहीं दिसत."

"शराबीका आंखे ऐसाभी होते है ।" सिगानं जाब केला.

"आन् कापरं भरलंय् हातांना– " शकू बोलली.

"सच– सच् ! तेरे वास्ते–"

"ए मला नाहीं कळत तू काय बोलतोस–"

"अभी समजेगा– अभी !" आणि शकूला घट्ट छातीशीं कवटाळून मेस्तानं पोरीचा मुका घेतला.

"ईस् ! अरे, मोठी झालें मी. मोठ्या माणसांचा मुका घेत नाहीत कोणी. दादा सुद्धां घेत नाहींत माझा." दाढीला धरून त्याची मान बाजूला करीत शकू ओरडली.

"मोठी हुयी— कितना, कितना ? देखूंगा तो—" तिच्या परकराची नाडी खेचत हंसून सिंग म्हणाला.

"फाजील— निलाजरा." हातानीं परकर गच्च पकडून शकू उसळली. "जा, शेरडूं सोडवून आण माझं. नाहींतर ह्यापुढं एक पण पापड नाहीं मिळणार सांगून ठेवतें."

मेस्त होता आपल्याच धुंदींत. आंवढे गिळीत. भसड्या आवाजांत तो पुटपुटला, "शेरडूं लावूंगा, कुत्ता लावूंगा, हत्ती लावूंगा. जो बोलेगी वहि लावूंगा ! हम बडा जादूगार है । छोकरी तुम फिकीर मत कर, देख तो सहीं–"

आणि हिसक्यानं त्यानं तिचा परकर खालीं ओढला. जोरजोरानं हंसत शकूला मिठींत कवटाळली. ती धडपडत होती, प्रतिकार करीत होती. उगाच– व्यर्थ ! कोल्ह्याच्या तोंडीं कोंबडीचं पिल्लूं– वरचं आभाळ कोसळत होतं. ढगावर ढग फुटत होते. विजा तुटत होत्या. सगळीकडे घरं, झाडं, धरणी टरटरा फाडून अन् चिरून आकाशपाताळ एक होत होतं.

## [२०]

**घाट्यांचं** पारिपत्य करण्यासाठीं दाजी नावराचा कान्ता गांवच गोळा करून घेऊन आला.

तोंवर खूप उशीर झाला होता. शेरडूं घेऊन घाटयांनीं केव्हांच पोवारा केला होता. धर्म्या रुद्र्याची पोर ती शकूपण कुठं दिसत नव्हती. ट्रक मात्र तिकडे रस्त्यांतच उभा होता.

एव्हांना सूर्य मावळतीला कड्याखालीं आडवा झाला होता नुसतं तांवडंच पेटलं होतं. ह्या सांज–उजेडांत सगळंच धगत अन् भगभगत असलेलं दिसत होतं.

द्वारकानाथ कुळकर्णी कान्ताला दोष देऊं लागला. ह्या अर्धवट गोराच्या बोलण्यावर विश्वास टाकला आणि गांवभर फुकट डांगोरा पिटीत तो इकडे धांवला होता. प्रत्यक्ष येऊन बघतों तर–कुठं काय? घाटी नाहींत, शिरडूं नाहीं, त्या शकूचा सुद्धां कुठंच पत्ता नव्हता. सगळं खोटंच होतं तर ! कान्ता नावराचा नसता शहाणपणा !

अण्णागुरुजी वाटच बघत होता. म्हणजे महत्त्वाची मिटींग बसली होती महामायेच्या देवळांत. मोठंच खलबत शिजत होतं. कधीं नाहीं तीं कंपनीचीं आणि हीं गांवचीं लोकं एकत्र आलीं होतीं. समोरासमोर बसून बोलणीं चाललीं होतीं. अण्णागुरुजीच्या मध्यस्थीनं जमिनीचा वाद तोडण्यासाठीं कंपनीला संबंधित लोकांशीं वाटाघाटी करण्याबद्दल रत्नागिरीच्या जिल्हा विकास मंडळानं सल्ला दिला. तर दाजी नावराच्या पोरानं हा व्यत्यय आणला. मिटिंग अर्धवट टाकून म्हाताऱ्याला उठावं लागंवलं होतं.

"भांचोद ! फुकट हेलपाटा ! तरी सांगत होतों–" अण्णानं हातवारे करीत तोंड सोडलं. "पण ऐकतो कोण ? ह्या गांवांत एकाहून एक सगळेच शहाणे. आं !" हें शेवटचं वाक्य अर्थात् द्वारकानाथाला उद्देशून होतं.

कंपनीचा मॅनेजर बरोबर होताच. हा राजाभाऊ गोळे नाक शिकरीत मोठ्यानं बोलला, "अण्णागुरुजी, मला हा डाऊट होताच. त्या मॅडकॅपचा हा सन. मला वाटतं, दाजी नावर मे क्रिएट ट्रबल– तो गोंधळ करणारच. काय ?"

असं मान ताठ करून वर आभाळांत ढग गडगडतात तशीं हीं लोकं बोलत राहिलीं. खालीं पायाकडे ह्यांचं लक्ष नव्हतं. तें कोणाचंसं होतं. रस्त्यांत उभ्या असलेल्या ट्रककडे तो बघत होता तर वाटतं त्याची नजर गेली. आणि डोळे पांढरे झाले. बोबडी वळली. तो आपला राहिला 'द द– देवा–' करीत. पुढं शब्दच फुटेना.

बंड्या नावरानं त्याला डाफरलं, "काय रे, दांतखिळी बसली ?"

तसा ट्रककडे बोट दाखवीत हा आपला पटकन खालीं बसला. कपाळावर हात मारीत राहिला.

आणि तिकडे बंड्या नावर काळजांत सुरी घुसावी असा कळवळला, "अरे–अरे ही पोर तर— त्या त्या रांडेची शकी—" .

रस्त्याच्या उजव्या कडेला ट्रकच्या आडोशाला सावित्रीची लेक ही शकू अस्ताव्यस्त धुळींत पडली होती. अंगांत फक्त पोलकं. खालीं परकर फाडून चिंध्या झालेला. रक्ताच्या थारोळ्यांत चिपचिब भिजलेला.

लोकं धांवलीं. भराभर पुढं झालीं.

तोंड उघडं वासलेलं. पापण्या बंद. श्वास थांबलेला. अंग ताठ, थंड— जमावास बघवेना. बघूनच माणसाला स्वतःची लाज वाटावी, आपल्यांतील श्वापदाची घृणा यावी, संताप यावा असाच हा अघोर प्रकार होता.

शकूचा निर्जीव देह नीट वस्त्रांत गुंडाळून बंड्या नावरानंच धर्म्या रुद्र्याच्या घरीं नेऊन पोचवला.

आत्तां दिवेलागणीला धर्म्याच्या ओटीवर बरीच गर्दी होती. धंद्याच्या दृष्टीनं खरी तेजीची वेळ हीच असे.

पायरीवरून बंड्यानं धर्म्याला साद घातली. तो घरीं नव्हता. आणि असता तरी त्यानं जाव नसता केला. मागिलदारीं कुठंतरी तो बसून राही. ओटीवर सामसूम होईपर्यंत तोंड दाखवीत नसे.

मधलं दार बंद होतं. आणि सावित्रीसुद्धां बाहेर ओटीवर नव्हती.

पुढं होऊन बंड्यानं जोरानं दार ठोठावलं. तशीं आजूबाजूचीं लोकं खवट हंसलीं.

"अरे आहे माहीत ! जरा दम खा कीं !" आंतून सावित्री तडकली, "आन् घाईच असली तर जा— जा दुसरीकडे."

"सावित्री, मी बंड्या—"

"अं !" सावित्री पुटपुटली. दार उघडून छातीवर पदर ओढत तिनं बाहेर डोकावलं. "अरे माझ्या देवा ! अरे, खरंच कीं ! कां रे आलास ?"

"काय करूं ?" बंड्या चिडला नाहीं. उलट जाड, गंहिवरल्या आवाजांत म्हणाला, "तुझे हे धंदे— पोर मात्र फुकट मेली."

"बंड्या, मेल्या पिऊन आलास काय रे ?" सावित्रीनं चेष्टेनं विचारलं, "तुझं कौतुक करायला टायम नाहीं रे मला. जा, लाव नंबर– बाकींच्यासारखा."

ओटीवरच्या गर्दीनंसुद्धां तिची ही सूचना उचलून धरली. सगळ्यांनीं एकदमच म्हटलं, "बिलकुल बरोबर !"

आत्तां मात्र बंड्या रागवला. सावित्रीवर नाहीं. ह्या बाकीच्यांवर. चवताळून ओरडला, "भांचोद ! चुप्प ! प्रसंग कोण आणि माय-च्यानूं हंसतां रे काय ?"

रस्त्यावरच्या उभ्या असलेल्या बरोबरच्या माणसांना त्यानं हातानं खूण करून बोलावलं. हीं लोकं जड पावलानं पुढं झालीं. शकूचा मृत देह दारांत पायरीवर ठेवून सुतकी चेहऱ्यानं उभीं राहिलीं.

जड, घोगऱ्या स्वरांत बंड्या नावर बोलला, "तुझी– तुझी ही शकू. रानांत घाट्यांनीं तिला धरली आणि ही – ही तऱ्हा केली."

इतकंच आणि तेंसुद्धां कसंबसं बोलून त्यानं काढता पाय घेतला. पाठ करून तो सरळ रस्त्याला लागला. गांवगुंड खरा, पण आतां इंथं अधिक थांबला तो तयार नव्हता. पुढील प्रकारला तोंड देण्याची त्याला छाती नव्हती.

मागं एकच हलकल्लोळ उठला. सावित्रीचा आकान्त तर विचारूं नये.....

अनुक्रमणिका

वाईट वातम्या गांवांत तेव्हांच पसरतात. पण ही ऐकून लोकं मुळीं विश्वासच ठेविनात. तो वसेचना. प्रत्यक्ष सत्य गोष्टसुद्धां खोटी करावी अशीच मुळीं विपरीत घटना होती. शकू—त्या वेडपट वर्म्याची चिमुकलीं पोर. गांवांत सगळ्यांना माहीत. सावित्रीच्या निमित्तानं तिच्या लेकीचं पण नांव निघे. गोरीगोमटी, अश्शा मोठ्या डोळ्यांची आणि वरी वाजिदी आहे ही शकी. उद्यां वयांत आली कीं सावित्री खोऱ्यानं पैसा ओढील, अशी चर्चा चाले. तर—तर शकूचं हें असं झालं. छेः छेः ! भलतंच, भयंकर ! हें असं नको व्हायला— असं नाहीं होणार ! सात-आठ वर्षांच्या पोरीवर हा—हा असला अत्याचार! घाटी झाले म्हणून काय झालं ? तींसुद्धां माणसंच आहेत कीं ! आणि होय, जनावरंदेखीलं हें असलं कृत्य नाहीं करीत. त्यांना पण ही अक्कल असते म्हणतात.

पण वातमी खरी होती. शकूची स्थिति प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेल्या माणसांनींच तसा निर्वाळा दिला. अणि तशीं मग लोकं काळजींत पडलीं. चिन्ता करूं लागलीं. घरांत पोरीवाळी होत्या त्यांच्या ! शकूच्याच वयाच्या. मोठ्या, लहानसुद्धां. लोकं विचारांत पडलीं. वैतागानं आणि उद्वेगानं ह्या कंपनीलाच शिव्याशाप करूं लागलीं. वरोवर ! कंपनीमुळं ही घाटी भुतावळ गांवांत शिरली होती.

तसं कोणी तरी डोचक्यांत घेतलं. ह्यापुढं घाटयांना गांवांत थारा नाहीं. हा विस्तवाशीं खेळ खूप झाला. होणार काय—आपलंच घर जळून जायचं ! हातांत काठी घेऊन पिसाटासारखा हा घाटी लोकांच्या मागं लागला. वोंवलत, हा असा— "तुम्ही ह्या गांवांत नको ! आधीं चालते व्हा. तिकडे तुमच्या गांवीं जाऊन हे उद्योग करा. आहेत तुमच्या पोरीवाळी; करा नागड्या, आडव्या घाला जीव घ्या त्यांचा. मला नाहीं सोयेरसुतक."

आणि हें असं वाटणारा गांवांत तो एकटाच नव्हता. खूप होते दुसरे. एकाचं उदाहरण वघून तेसुद्धां पेटले.

रात्रींचा भाकरतुकडा खाऊन घाटी लोकं नुकतीं कुठं अंथरुणावर पडलीं होतीं. गांवाकडल्या गोष्टी चाललेल्या. थकले भागले, नुसं अंग टाकतांच ह्यांना निजा येत नसत. घोर होतेच मागं. शिवाय एक एक आठवणी. तर एकाएकीं हाकाटी झाली. कालवा झालेला ऐकूं आला. कसली गडवड म्हणून धडपडत उठून कानोसा घेतात— तर घरवाल्याच्या नांवानं शंख करीत जमाव ओटीवर चढलासुद्धां. आणि सुटलीं वडवीत दिसेल त्याला. पोरंच वहुतेक. फाजील उत्साह. विचार, विवेक कमी. अशांत टाळक्यांत वारं भरलेलं.

"दादा, अहो घाटी आम्ही." काळोखांत घाटयांनीं ओळख दिली. त्यांना वाटलं, भाऊवंदकीची काहीं भानगड असावी. काळोखांत माणूस न दिसल्यानं आपल्याला मार वसला.

"दुसऱ्यांच्या दारावर दुसरं कोण पडणार ? एक कुत्रीं, नाहींतर घाटी. आणि कोणी नाहींसं वघून घरांत पोरींवाळींवर तुटून पडणार भांचोद ! जीव हवा असला तर हिथनं काळं करा. हा गांव सोडून चालते व्हा." असा उर्मट जाव मिळे.

"आम्हांला पण पोरंबाळं आहेत दादा." घाटी त्यांची समजूत काढूं बघत.

आणि त्याबद्दल विचाऱ्यांना काठ्यांचे तडाखे खावे लागत. लोकं खवळलीं होतीं. हातांत काठ्या. कशाला कोणाचं ऐकायच्या भरीस पडतील ? घरांत कोणी बाप्या असला तर तोसुद्धां ह्या जमावांत सामील होई. बायाबापड्या आंतून ओरडत, "न्या ओढत मेल्यांना. हांकलून लावा ह्या गांवांतनं."

जमाव वाढत चालला होता. हुल्लडबाजीला जोर आला होता. ओरड्या अन् घोषणा चढत होत्या. रात्र झाली तशा मशाली पेटल्या. घराघरांत शिरून घाटी लोकांना ओढून काढण्यांत येत होतं. त्यांना शिव्याशाप मिळत होते. मारपीट होत होती. ओटीवरील त्यांचं सामानसुमान, बाडबिस्तार, पेट्या अन् भांडीकुंडीं रस्त्यावर पडत होतीं. आतां ह्या वस्तूंना किंमत नव्हती म्हणून बरं ! नाहींतर लुटालूट झाली असती.

हें असं उभं गांवच घाट्यांविरुद्ध फिरलं होतं. आतां देवसुद्धां त्यांचं रक्षण करूं शकत नव्हता ! खरोखरच उघड्या देवळांतसुद्धां त्यांना थारा नव्हता....आणि जीव घेऊन ते धांवत सुटले होते. वाट फुटेल तिकडे. बोलणार काय आणि कोणाला ? करणार तरी काय ? काळोखांत ठेंचा खात आणि धांपा टाकीत ते पळत होते. दम खायला सवड नव्हती. वळून मागं बघायला हिंमत नव्हती. अकस्मात हें काय कर्म उभं राहिलं, त्यांना कांहीं कळत नव्हतं. तर्कसुद्धां करतां येत नव्हता. ते पार गडबडून गेले होते.

बाहेर फाटकावर येऊन विजय केव्हांपर ही आरडाओरड ऐकत उभा होता. नक्की काय प्रकार आहे त्याला कळेना. कळत होतं इतकंच कीं गांवांत कांहींतरी गडबड चालूं झाली आहे.

रस्त्यानं धांवत येणाऱ्या ह्या घाटी लोकांना त्यानं विचारलं, "काय गडबड आहे रे ?"

साहेबाचा आवाज ऐकला आणि घाट्यांचीं पावलं मग उचलेनात. ते जागच्याजागीं थांबले. पुढं गेलेले मागं फिरले. त्यांना निवारा, आश्रय मिळाल्यासारखं वाटलं. विजयसाहेब आपल्याला मरूं देणार नाहीं अशी त्यांची श्रद्धा होती. त्यांच्या जिवांत जीव आला. हायसं वाटलं.

धापा टाकीत तीं सांगूं लागलीं, "साहेब, गांवचीं लोकं काठ्या घेऊन फुकट मागं लागलींत आमच्या. म्हणतात हिथं राहूं नका– गांव सोडून चालते व्हा."

"पण कां ?" त्यानं आश्चर्यानं विचारलं. त्याला कशाचा कांहीं पत्ता नव्हता. अण्णागुरुजी अजून घरीं आला नव्हता. आणि खुशाली कुठं भटकत होता देव जाणे. कदाचित ह्या जमावांतहि असेल !

"तें नाहीं सांगत. विचारलं तर मारूं लागतात." एकजण म्हणाला.

"आणि तुम्ही घाबरून पळत सुटलांत ?" विजयनं चिडून प्रश्न केला. "मरा लेको असेच !"

चारचौघे एकदम म्हणाले, "गांव त्यांचं. तंटा कसा करणार ?"

"कसा करायचा तें मी शिकवतों. चला, व्हा अंत. बाकीच्यांना पण बोलवा. बघतों इथून कोण घालवतो तुम्हांला ?"

तासाभरानं शेंपन्नास माणसांचा जमाव हळ्या देत फाटकांतून अंगणांत शिरला. खुद्द अण्णागुरुजीच आघाडीवर होता. विजयनं घाटी लोकांना आश्रय दिला ही बातमी एव्हांना जमावाला लागली होती.

विश्वामित्रासारखा उजवा हात झटकीत अण्णागुरुजी ओरडला, "विजय, मी तुझा मामा आज्ञा करतों आहें. बाजूला हो तूं. ह्या गांवकींत पडूं नकोस —"

"माफ करा मामा !" विजयनं पुढं येऊन नम्रतेनं म्हटलं.

"बेटा, इंग्रजींत रेप, मराठींत बलात्कार– हा एक मोठा गुन्हा आहे. एकदम देहान्ताची सजा, शिवाय काळंपाणी." म्हातारा भाच्याला समज देऊं लागला.

विजय गोंधळला–गांगरला, "बलात्कार ?"

"होय. धर्म्या रुद्र्याच्या त्या पोरीवर रे. त्या तशा स्थितींत ही शकू रानांत सांपडली आम्हांला. मेलेली– थंड, ठार ! वाईट गोष्ट झाली. भांचोद, ह्या ह्या घाट्यांचंच हें कृत्य—"

अण्णागुरुजीच्या डोळ्यांत पाणी होतं. स्वर कांपरा होता. हात थरथरत होते.

विजय हादरला. चार पावलं मागं फिरला. शून्य दृष्टीनं समोर जमावाकडे बघत राहिला. सगळंच उफराटं, उलटंपालटं, खालीं डोकं, वरपाय असल्यासारखं त्याला दिसत होतं.

कांहींच क्षण—

कारण इतक्यांत मागं रस्त्यावरून दाजी नावराचा खणखणीत आवाज उठला, "अण्णा, भडव्या महामायेच्या देवळाला वरा कळस चढवलास रे तूं ?"

अण्णागुरुजी एकदम खवळला, "तूं–तूं मध्यं पडूं नकोस. हिथं तुझं काम नाहीं दाजी."

"थोबाड फोडीन ! मोठा पुढारी झालायस आहे माहीत ! हें तुझं पुढारीपण – नालायक ! गरीब, भेकड, दुबळीं – हीं घाटीं लोकं. ह्यांच्याविरुद्ध उठव गांव,! ह्यांना गांवाबाहेर काढलीं कीं तुझी महामाया तृप्त होणार आहे. वर देणार आहे तुला. तुला महात्मा करणार आहे— दाजी आवेशानं उसळला होता. "थू तुझो !"

"हेंच पुन्हां – पुन्हां बोल –" काठी उगारून अण्णागुरुजी दाजीच्या अंगावर धांवला.

"कां रे ? तुला काय वाटतं: पुढारी झालास म्हणून तुला मी भितों ?" दाजी नावरानं विचारलं. मुद्दामच चार पावलं अण्णाला तो समोर गेला. तुच्छतेनं, उद्धटपणं बघत. म्हाताऱ्याच्या वटारलेल्या डोळ्याला डोळा देत.

लोकं मध्यं पडलीं. अण्णागुरुजीला त्यांनीं बाजूला ओढलं. तो बेफाम होता. अनावर झाला होता. संतापानं चुलीसारखा धगधगत होता. दांतओठ खात त्यानं दाजीला आव्हान दिलं, "आलाच आहेस, तर आतां सोडव ह्या घाट्यांना. तुझातरी पराक्रम बघतों."

"हा दाजी कशाला आला रे हिथं, तुझ्या दारावर ? ह्याचसाठीं." जमावानं एकच गिल्ला केला. बिलकुल नापसंती दर्शविली,

अनुक्रमणिका

"नाहीं दाजी. बाकी कांहीं बोला, मानूं. पण ह्यापुढं गांवांत घाटी माणूस नाहीं पाहिजे. नाहीं रहूं देणार आम्ही."

दाजी नावर लोकांच्या कालव्याकडे लक्ष देतो कशाला ? जमावांतून वाट काढीत, लोकांना हातानं बाजूला करीत अण्णागुरुजींच्या घराच्या पायरीवर तो उभा राहिला. ताठ, देवळांतील रवळनाथाच्या पाषाणमूर्तीसारखा. दारांतच, वाट अडवून आणि जखमी, व्यथित आवाजांत म्हणाला, "माणसंच ना रे तुम्हीं ? हें काय करतां आहांत ? आं ! छी :! थोडा विचार करा. आणि तो नसला तर ऐका माझं. आधीं मागं फिरा... हें जें काय चाललं आहे तें बरोबर नाहीं. खोटं आहे, बिलकुल गाढवपणा आहे. हा अण्णा पुढारी म्हणवतो स्वतःला गांवचा. पण भांचोद् बेअक्कली आहे हा. जबाबदारी होती त्याची, कर्तव्य होतं. तुम्हांला सांगण्याचं. पण तोच तुम्हाला शूः शूः करतोय्, पिसाळून देतोय्. छीः वाईट गोष्ट ---!"

अण्णागुरुजी मध्यंच ओरडला, "म्हणजे हीं गांवचीं लोकं कुत्रीं तर ! अरे, तुम्हांला कुत्रीं म्हणतो रे हा दाजी. आणि तुमच्याच तोंडावर. ऐका—"

दाजी कैफांत होता. त्यानं आवाज आणखीन् चढवला. सांगितलं, "होय, कुत्रींच. पिसाळलेलीं. म्हणून तर कोणी एकानं शेण खाल्लं आणि त्याचं प्रायश्चित्त उभ्या जातीला द्यायला निघालीत हीं हा न्याय झाला ? का माणुसकी झाली ?..."

जमावानं त्याला पुढं बोलूं दिलं नाहीं. "ओढा रे वामणाला खालीं. पाडा आडवा. सावित्रीच्या त्या लेकीसारखाच. गांवच्या लोकांना कुत्रीं म्हणणारा इसम गांवांत नको." असा वकवा करीत लोकं पुढं झालीं. दाजी नावराला गराडा घालून खालीं आडवा पाडण्यासाठीं धांवलीं. लाठ्याकाठ्या मिरवीत, मशाली नाचवीत.

पण ह्यांना रोखलं, थोपलं घाटी लोकांनीं. आंतून तीं एक एक उसळून बाहेर आलीं. न राहून, असह्य होऊन आपल्यासाठीं ह्या देवमाणसाचा बळी पडावा ही गोष्ट त्या अडाणी लोकांना पटेना. श्रद्धेवर जगणारीं हीं माणसं, त्यासाठींच मरणारीं असं कांहीं झालं कीं मग त्यांना आपला विचार रहात नसे. मरणाचं भय नसे. उद्यांची फिकीर नसे. दाजी नावराभोंवतीं कडं करून तीं उभीं राहिलीं. हातांत काठ्या, त्या पेलण्या इतकी ताकदपण. विशेष म्हणजे त्यांच्या मनाची तयारी झाली होती.

त्यांनीं ठाम बजावलं, "हां खबरदार ! दादांच्या अंगाला हात तर लावा—"

घाट्यांचा हा आवाज गांवांत लोकांना अनोळखी होता. जमाव थबकला, विचकला. गोंधळून एकमेकांकडे बघू लागला. समोर दिसणारे हे चेहरे पण त्यांना नवीन होते. घामानं आणि मातीनं रंगलेलीं लाल डगलीं, खालीं कळकट तोकड्या चड्ड्या. उंच, धिप्पाड देह, बावळी मुद्रा, अजागळ ध्यान— होय, लोकं घाटींच ! पण —पण ह्यांच्या डोळ्यांत आज वेगळीच जाणीव होती, जाग होती.

दाजीला मात्र हें नको होतं. खुद्द त्यांच्या गांवांत परगांवच्या लोकांनीं त्याचं रक्षण करावं ? त्याला कमीपणा होता, अपमान होता. ह्याहून मरण पत्करलं. सभोंवतीं कडं करून उभे असलेल्या घाट्यांना त्यानं आवेशानं बाजूला लोटलं. ताड् ताड् पावलं टाकीत तसाच तो जमावावर चालून गेला. बडबडत. "मरणार मी...माझ्या गांवचीं लोकंच मरणार ! आं ! तर तुम्ही कां रे बाद्योंनो मध्यं पडतां ! मला मरूं द्या—"



# रंगभूमि अशी साकार झाली !

## श्रीकलमेश्वर -- रंगभूमीचें आदिदैवत

**कै. अण्णासाहेब** किर्लोस्कर यांचें मूळ गांव बेळगांव जिल्ह्यांतील गुर्लहोसूर. तेथील महादेवाचें मंदिर श्रीकलमेश्वर म्हणून प्रसिद्ध आहे. किर्लोस्कर संगीत मंडळीचा मुक्काम एकदां उज्जैनला असतांना सर्व मंडळी स्नानासाठीं क्षिप्रा नदीच्या घाटावर जात असत. तेथें महादेवाची पिंडी शाळुंखेंत घट्ट बसविलेलीं अशीं अनेक महादेवाची छोटीं मंदिरें होतीं. कंपनीमधील श्रीधरभय्या या बाढ्यानें एक संगमरवरी पिंड म्हणजे बाण पाहिला. भांग वाटण्यासाठीं हा गुळगुळीत दगडी वरवंटा उपयुक्त ठरेल अशा विचारानें त्यानें परिश्रमपूर्वक तो बाण हलवून हलवून शाळुंखेंतून उपटून काढला आणि गुप्त रीतीनें आपल्याजवळ लपवून ठेवला. पुढें किर्लोस्कर मंडळी उज्जैनीचा आपला मुक्काम हलवून इंदूर येथें आली तेव्हां श्रीधरनें भांग वाटण्यासाठी त्या बाणाचा उपयोग उघडपणानें करण्यास सुरवात केली. कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांच्या नजरेस ही गोष्ट आल्यानंतर त्यांना या गोष्टीचा फार खेद वाटला. चांदीचा नाग वेटोळें अशी बैठक करवून घेऊन त्यांनीं त्या बाणाची स्थापना कंपनीच्या देव्हाऱ्यांत केली. हा बाण म्हणजे आपला गुर्लहोसूरचा श्रीकलमेश्वरच अशी त्यांच्या श्रद्धाळु मनाची समजूत होती. श्रीकलमेश्वराची नित्य आणि नैमित्तिक पूजा करण्याची प्रथा त्यांनीं शेवटपर्यंत पाळली. किर्लोस्कर मंडळीच्या मालकींत फेरफार होत गेले तरी या पूजाकृत्यांत कधीं अंतर पडलें नाहीं.

श्रीकलमेश्वर किर्लोस्कर मंडळींत येऊन दाखल झाल्याची घटना १८८३ सालीं घडली असें सांगतात. १९१३ सालीं किर्लोस्करमधील प्रमुख नटवर्गांत फाटाफूट होऊन श्री. बालगंधर्व, श्री. गोविंदराव टेंबे








आणि श्री. गणतराव बोडस ह्या त्रिवर्गानें गंधर्व नाटक मंडळीची स्थापना केली. किर्लोस्कर कंपनीमधील ब्राह्मण पुजारी कृष्णाप्पा जोशी गंधर्व कंपनींस येऊन मिळाले. येतांना त्यांनीं गुपचूप हा पूजेचा वाणहि आणून गंधर्व कंपनीच्या देवघरांत त्याची स्थापना झाली. त्याच्या पूजेअर्चेची व्यवस्था गंधर्व मंडळींत नियमितपणानें होत राहिली. परंतु पुढें, कालांतरानें, हा श्रीकलमेश्वर महाराष्ट्र-कोकिळ श्री. शंकरराव सरनाईक ह्यांच्या मालकीच्या यशवंत संगीत मंडळींत येऊन दाखल झाला. श्री. शंकरराव सरनाईक यांच्या घरीं, कोल्हापूरला, हा वाण आतां त्यांच्या देवघरांत असून त्याची पूजाअर्चा श्रद्धेनें केली जात आहे.

('[illegible]ठी रंगभूमि' या आगामी चित्रपटांतील चित्रसंग्रहामधून श्री. के. टी. देशमुख यांच्या सहकार्यानें). ●●●

---

(मागील पानावरून)

तसा गांवच्या लोकांचा जमाव आणखीन् गोंधळला. दाजी नावर कटा सांपडलेला. तरी पण लोकं पुढं होईनात. दोन पावलं मागंच फिरलीं.

फणफणत उभा होता अण्णागुरुजी. द्वेषानं, मत्सरानं जळत होता. जमाव मागं फिरतो आहेसं दिसतांच त्याच्या काळजांत कळ निघाली. पराभव झाल्याचं दुःख झालं. गांवचा पुढारी तो– पण गांव माघार घेत होतं–हातांतली काठी आपटत लोकांना तो उत्तेजन देऊं लागला, "अरे भांचोद, बघतां काय ? पुढं व्हा, व्हा पुढं. घाटचांना हांकला. पिटाळून काढा गांवांतून..."

इतक्यांत रस्त्यानं रडत ओरडत धर्म्या रुद्रे तिथं हजर झाला. तो गळा काढून मोठ्यानं ओरडला, "अरे, ऐकलींत कवटी फुटली–ठो ऽ ! आतां परता घराला. काळोख झाला —" ●●●



# कथा-विशेषांकाच्या निमित्तानें

**गेल्या** मार्च महिन्यांत "मराठी कादंबरीचा मानदंड" म्हणून ज्यांचा गौरव अनेक साहित्य समीक्षकांनीं केला त्या कै. हरिभाऊ आपटे यांची जन्मशताब्दि साजरी झाली. कांहीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं. कांहीं नाटकें लिहिलीं गेलीं, कांहीं कथांना पुनर्मुद्रणाचें भाग्य लाभलें तर पुण्याच्या एका प्राध्यापकानें खुद्द हरिभाऊंनाच एका कादंबरीचे नायक बनवून एक कादंबरी लिहून टाकली. त्या निमित्तानें पुन्हां एकदां हरिभाऊंच्या कादंबऱ्या, त्यांच्या स्फुट गोष्टी, त्यांचीं नाटकें वाचलीं गेलीं. त्यांच्यावर कांहीं नवें भाष्यही लिहिलें गेलें. हें सारें ठीकच झालें ! अशा तऱ्हेचें सिंहावलोकन नेहमींच कला – साहित्याच्या विकासाला उपकारक ठरत आलें आहे. त्यादृष्टीनें हरिभाऊंची 'गोष्ट' ही किती यशस्वी, किती 'ताजी' व किती 'सनातन' आहे हें ध्यानीं आलें. जन्मशताब्दीच्या निमित्तानें मींही त्यांच्या कथा पुन्हां वाचल्या आणि कळविण्यास आनंद होतो कीं, त्या आजही वाचनीय आहेत. मननीयही आहेत. त्या कथांत रंजकता आहे. चमत्कृतीची हौस आहे. वाचकाला विश्वासांत घेऊन केलेलें हितगुज आहे. माणसाच्या स्वभावांतल्या स्थायी गुण दोषांचें चित्रण आहे. त्या वाचतांना त्यांचें प्रवाहित्व, जिवंतपणा जाणवतो. एका विशिष्ट वर्गाचें तें चित्रण आहे हा आक्षेप उरत नाहीं. कारण "अनुभवांचा सच्चेपणा जाणवणें" हें जें यशस्वी वाङ्मयाचें लक्षण मानलें जातें तें त्या गोष्टींतून जाणवतें. आधुनिक मराठी कथेचें – कादंबरीचें जनकत्व हरिभाऊंकडेच जातें असें म्हणणें उचित ठरेल. ही आधुनिकता केवळ तंत्रांत असते – आहे असें मी मानीत नाहीं. ती मंत्रांत असते असेंच मी मानतों. आणि म्हणूनच हरिभाऊंच्या यशस्वी संसार चित्रांची मोहिनी आजही जाणवते.

कै. हरिभाऊंपासून मराठी कथा हा महाराष्ट्राच्या भावजीवनाचा एक अविभाज्य भाग बनला आहे. सर्वसामान्यपणें 'कथा' हा वाङ्मयप्रकारच सर्वांचा आवडता असा वाङ्मयप्रकार मानला जातो. कथांचें पीक हें एकूण जागतिक वाङ्मयांतच विपुल आहे. मराठींतही तें उदंड आहे. पण निर्मितीचें वैपुल्य हें नेहमींच गुणवाचक ठरतें असें नाहीं. पुष्कळ वेळां आरोग्य निदर्शक ठरण्याऐवजीं ती 'सूज' ठरते. आणि मग त्या विपुलतेची चिकित्सा फेरतपासणी करण्याचा प्रसंग येतो.

आज मराठींत विपुल कथा लिहिली जात आहे. नवनवीन मासिकें जन्म घेत आहेत. जन्म घेतल्यावर 'मला गोष्ट हवी' असा हट्ट धरीत आहेत आणि त्यांचा तो हट्ट पुरविणारे कथाकारही विपुल संख्येनें वाढत आहेत. मासिकांना 'कथा' कमी पडत नाहींत. उलट पुरून 'उरतात' वाचक वाढले आहेत. (कदाचित् रुपयांत सर्व मासिकें देणाऱ्या सर्क्युलेटिंग लायब्ररींमुळेंही असेल) त्यांच्यातली वाङ्मयीन जाणीव वाढत आहे. वाचकांचा साक्षेपी पत्रव्यवहारही वाढत आहे. कांहीं नवीन नांवें वारंवार वाचायला मिळताहेत. हें सारें मोठें आशादायक आहे. मराठी कथेबद्दल आदर वाटायला लावणारें आहे. पण विचारी मनाला तें अंतर्मुख करणारेंही आहे. जमाखर्च मांडायला लावणारेंही आहे. कांहीं वेळां गोंधळांत पाडणारेंही आहे.






# मराठी कथा

## —एक प्रकट चिंतन



—प्रभाकर अत्रे

हें उदंड पीक पाहूनही मनांतल्या खंतीं बाकी उरतातच. कलेच्या सर्वच क्षेत्रांत येणारी पिढी कांहीं तरी नवीं स्वप्नें पाहत प्रवेश करते. कालच्या स्वप्नांचा आधार तिला असतो आणि आजच्याच नव्हे तर उद्यांच्याही स्वप्नांचा ध्यास घेऊन ती आलेली असते. मानवी जीवनाची गतिमानता हाच जीवनांतूनच फुलणाऱ्या, बहरणाऱ्या, जीवनरसानें नटणाऱ्या कलांचा गुणधर्म (प्राणतत्त्व) असतो. आणि म्हणूनच जसा समाज तशी त्याची कला, तसें त्याचें वाङमय, असें नेहमीं म्हटलें जातें. प्रत्येक समाजाला हा स्वतःचा वारसा घेऊनच कांहींशी वाटचाल करायची असते. पण ही वाटचाल करीत असतांना प्रत्येक पिढी कांहींना कांहीं नवीं क्षितिजें पहाते. त्या ताकदीवरच वाङमय-कलांची उंची, खोली वा सामर्थ्य ठरत असतें. कारण स्वप्नें पाहण्याचीं, तीं रंगविण्याची, त्यांना हवा तसा आकार देण्याची शक्ति हीच कोणत्याही कलेची शक्ति असते.

मराठी कथेच्या क्षेत्रांत निरनिराळ्या कालखंडात अशाच तऱ्हेचीं स्वप्नें पाहणारीं माणसें होऊन गेलीं. त्यांतलीं कांहीं गेलीं असली तरी बरीचशीं माणसें आज हयात आहेत. त्यांचें लेखन चालू आहे. कांहींचें संपलें आहे. दिवाकर कृष्ण हें नांव या संदर्भात नेहमीच घेतलें जातें. दिवाकर कृष्ण हें नांव आजच्या कुठल्याही मासिकांत दिसणार नाहीं. नारायण हरि आपटे हें नांव अजून अधुनमधुन डोकावतें. वि. वि. बोकील, प्रा. फडके, वि. स. खांडेकर, द. र. कवठेकर, र. वा. दिघे हीं नांवें अजून तशीं "जुनीं" झालीं नाहींत. यांतली कांहीं अजूनही नवतेचा आभास उत्पन्न करूं शकतात. कांहीं चांगलीं नांवें राखून आहेत.

'नवकथा' म्हणून जिचा उल्लेख केला जातो ती कथा रूढ करणारे गोखले, गाडगीळ, सदानंद रेगे, जी. ए. कुलकर्णी, भावे—माडगुळकर यांच्यासारखीं मंडळींही अजून लिहीत आहेत. 'नवकथा' म्हणून एके काळीं टीकाविषय झालेली कथा आतां स्थिरावली आहे. येवढेंच नव्हे तर तिची शक्ति व तिच्या मर्यादाही आतां स्पष्ट झाल्या आहेत. ज्यांनीं 'नवकथे'ची भरपूर भलावण केली त्या प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्या-सारख्यालासुद्धां शेवटीं नवकथेच्या मर्यादांची जाणीव झाली व त्यांनीं तसा इषाराही देऊन टाकला. नवकथेच्या जडणघडणींत ज्यांच्या कथेनें अत्यंत महत्त्वपूर्ण कामगिरी केली आहे त्या श्री. पु. भा. भाव्यांनींही हें भवितव्य ओळखलें, जाणकारपणें ओळखलें व प्रा. गंगाधर गाडगीळ यांच्या "नव्या वाटा" ह्या संग्रहाला प्रस्तावना लिहितांना स्पष्टपणें मर्यादा व्यक्त केल्या. बडोद्याला ४–५ वर्षांपूर्वी केलेल्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनींच पुन्हां त्याच वृत्तीचा अधिक्षेप केला व नवसाहित्याविषयींच्या मर्यादा स्पष्ट केल्या.

'नवकथे'संबंधीं प्रा. गंगाधर गाडगीळ यांनीं विपुल, विस्तृत व सुस्पष्टपणें लिहिलें आहे. प्रा. गाडगीळ यांच्यासंबंधीं एक गोष्ट सादर नमूद केली पाहिजे. आणि ती, म्हणजे प्रा. गाडगीळ यांनीं मराठी नवकथेंत फार मोलाची भर घातली आहे. पण कथाकार गाडगीळांच्या बरोबरच किंबहुना त्याहून अधिक महत्त्वाचें स्थान मी टीकाकार गाडगीळ यांना देईन. 'नवसाहित्य' हा त्यांचा केवळ श्रद्धा विषय नाहीं तर त्यांचा सखोल चिंतनाचा विषय आहे. नवकथेबरोबरच मर्ढेकरांच्या कवितेचाही सापेक्षी परामर्श घेतांना गाडगीळ दिसतात. प्रा. गंगाधर गाडगीळ यांनीं आपल्या "खडक आणि पाणी" या पुस्तकांत मराठी लघुकथा, फुसकें आव्हान, नवकथेचें स्वरूप, नवकथा, स्वरूप आणि आक्षेप इत्यादि प्रकरणांतून ह्यासंबंधीं केलेली चर्चा महत्त्वाची आहे. त्यांतील सर्वच मतें सर्वांना पटतील असें नाहीं. साहित्यचर्चेतच केवळ नव्हे तर जीवन विषयक कुठल्याही चर्चेतला अंतिम शब्द कुणालाच सांपडलेला नसतो. परंतु आपल्याला जाणवलेलें भावसत्य इतरांपर्यंत पोंहचविण्याचीच ती एक धडपड कलावंत शास्त्रज्ञ करीत असतो. प्रा गंगाधर गाडगीळ म्हणतात त्याप्रमाणें नवकथेनें कथासाहित्याच्या कक्षा विस्तृत केल्या आहेत याबद्दल वादच नाहीं. कलात्मक तटस्थ्यानें जीवनाच्या विविध स्तरांत अवगाहन करून विविध भावसत्यें आजचा कथाकार जाणून घेण्याचा प्रयत्न करतो आहे. जीवनाच्या ठोकळेबाज कल्पना त्याला मान्य नाहींत. माणसाच्या मनांतल्या सूक्ष्म धाग्यादोऱ्यांशीं कांहीं नातें जोडण्याचा तो प्रयत्न करीत आहे. एकाद्या कम्युनिस्टाप्रमाणें जग हें वर्गविग्रहावर आधारित आहे असें तो मानीत नाहीं. श्रीमंत आणि गरीब सुंदर आणि विरूप अशी ठरीव विभागणी त्याला मान्य नाहीं. ऐहिक स्थिती कशीही असली तरी माणूस अखेर माणूस आहे. तो एकाच वेळीं सुष्ट आणि दुष्ट, लहान आणि मोठा, चोर आणि साव, साधु आणि डाकू असूं शकतो असें तो पहातो. किंबहुना मानवी मनांतले सूक्ष्मातिसूक्ष्म धागे उलगडण्याचा तो यथामति प्रयत्न करतो आहे. मानवी मोठेपणाचें एकांगी भडक चित्रण हें जीवनाचें वास्तव चित्रण आहे असें त्याला वाटत नाहीं. विशाल अनुभवांतून अर्थातच तो विकसित होतो आहे. जुने संकेत त्यानें झुगारून दिले आहेत. हें सारें खरें आहे. माणूस हा सोंगटयां-सारखा आहे. पटाचें संचालन करणारी निगूड शक्ति तिची गति-प्रगति ठरवीत असतो याची त्याला जाणीव आहे. नियतीचा प्रभावही त्याला ठाऊक आहे. हें सारें नवकथेनें केलें आहे. असें दिसून येईल. पण मग ह्या नव्याचांही सांगाडा ठरला गेला. संकेत मोडायच्या कल्पनेचा एक नवा





अनुक्रमणिका

संकेत कळत नकळत रूढ झाला. माणसाच्या मनांतली गुंतागुंत शोधण्याच्या प्रयत्नांत फक्त "फ्रॉइड"च हातीं आला. सर्वत्र अतृप्त कामेच्छाच नांदते आहे, असा भास उत्पन्न झाला-मन पकडण्याच्या प्रयत्नांत शरीराचें दृश्यमानाचें महत्त्व कमी झालें आणि मग शरीर हा 'विक्रया' चा विषय झाला. माणसाच्या मनांतल्या विसंगतींतून सुसंगति शोधण्याच्या प्रयत्नांत हातीं आल्या फक्त विकृति! माणसाच्या मनांतलें मोठेंपण हें सांकेतिक वाटूं लागलें व त्याची क्षुद्रता हें कांहीं तरी नवें वाटूं लागलें. वास्त[illegible]मर्यादाची झेंप घेऊं इच्छिणाऱ्यांनीं तें अमर्याद पाहिलेंच नाहीं. पचविणें दूरच! व्यास वाल्मिकीनें लोकोत्तर पाहिलें, लोक विलक्षण पाहिलें आणि क्षुद्रताही पाहिली. एकेका ग्रंथांत हें सारें विशाल अनुभव अमररूप करून टाकले. जीवनांतली क्षुद्रताही त्यांनीं अलिप्ततेनें मांडली. गोवर्धन पर्वताचें निमित्त करून सामान्यांतलें असामान्यत्वही टिपलें. वाळूचे कण देऊन महान कार्याला सहाय्य देणारी 'खार' ही त्यांनीं रंगविली. सीतेचें हरण करणारा पण तिच्या चारित्र्याला धक्का न लावणारा रावणही त्यांनीं रंगविला, 'नरो वा कुंजरो वा' म्हणून स्खलित होणारा धर्मराजही त्यांनींच रंगविला. हें विश्वरूप जगांतल्या साऱ्याच श्रेष्ठ कलाकारांनीं पाहिलें आणि रंगविलें आहे.

आजच्या कथांच्या संदर्भांत विचार करावयाचा झाला तर असें आढळून येईल कीं, नवकथेनें मळलेली वाट एका विशिष्ट चालीनें चालते आहे. प्रा. गाडगीळ यांचीं मतें मान्य करूनही मला असें वाटतें कीं, संकेत मोडूं बघणारी कथा पुन्हां सांकेतिकच होऊं पहात आहे. जीवनांतले सुष्ट, दुष्ट अनुभव पचवूनही ती अजून 'नीलकण्ठ' झालेली नाहीं. अनेक विषारी अनुभव पचवूनही आजचा कथाकार कांहीं 'नवें जग' दाखविण्याची क्षमता दर्शवूं शकत नाहीं. प्रा. गाडगीळांनीं कथालेखन थांबविलें आहे. पु. मा. भावे, माडगुळकर, गोखले, रेगे, मोकाशी, अच्युत बर्वे, महादेवशास्त्री जोशी यांचें कथालेखनही कांही प्रमाणांत मंदावलेलें दिसतें. जी. ए. कुलकर्णी, विद्याधर पुंडलीक ह्यांच्या लेखनालाही वेग नाहीं. पण


"वा ! घड्याळ शेवटीं चालूं लागलें !"

या मंडळींच्या चांगल्या लेखनांतलें चांगुलपण आजच्या कथाकारांनीं जाणलें नाहीं. कलेपेक्षां कारागिरीला तेजी आली आणि मग माणसांतल्या विकृतीलाच पुन्हां एकदां साहित्यांत तेजी आली. श्लील अश्लील वादांत मी इथें शिरत नाहीं. कारण तो एक स्वतंत्र विषय आहे. परंतु कथेला (व खऱ्या कलेला) अविषय असें कांहीं नाहीं म्हणत म्हणत माणसें पुन्हां पुन्हां 'फ्रॉइड' च आठवतांना दिसताहेत. "मानवजंतु" म्हणून त्याची क्षुद्रताच सतत कथाविषय होत आहे. उदारधि कर्ण, सत्यप्रतिज्ञ भीष्म, उग्रतपस्वी शुकमुनी, ध्रुव, मुलाचें मांस अतिथीनें मागितल्यावर मुलाला उखळींत कांडणारी चांगुणा व तिचा पति श्रियाळ, स्वप्नांतले शब्द खरे करणारा हरिश्चन्द्र, पित्याच्या आज्ञेनें वनवास मंगल करणारा राम, भावावर असामान्य प्रीति म्हणून स्वखुशीनें वनवास पत्करणारा लक्ष्मण ह्या व ह्या सारख्या अनेकांचीं चित्रणें आजही शक्य आहेत. आजही ह्या मानवजंतूंतही कांहीं 'तपस्वी' आढळतील त्यांतही एखादा 'नारायण' (अंतराळ) आढळेल, एखादा दाजी शिंदे, विश्वासराव, अभिमन्यु अढळेल. पण हें महत्तमत्व आज आम्हांला दिसेनासेंच झाले आहेसें वाटतें. आजही 'कर्मयोगी' आहेत. राम लक्ष्मण आहेत. स्खलित होणारी द्रौपदीही आहे. पण केवळ स्खलित द्रौपदीचेंच चित्रण आज धर्म्य झाल्यासारखें वाटतें. वास्तविक 'माणसाचें मन अधिक कळलें आहे. बंधनें गळून पडलीं आहेत.' म्हणणाऱ्यांनीं हा विशाल अनुभव अभिव्यक्त करणें अगत्याचें आहे. चीनच्या लढाईचे वेळीं सामान्यांचें असामान्यत्व कितीतरी ठिकाणी प्रगटलें, पण त्यांच्या कथा झाल्या नाहींत. कल्याण कँप मध्यें मध्यंतरीं दोनदां गेलों. माणसाच्या आशावादाची, कर्तृत्वाची, शून्यांतून परार्ध उत्पन्न करण्याची शक्ति तिथें प्रत्ययाला आली. ज्यांनीं महाल पाहिले त्यांचें खुराडयांतलें जीवन मीं पाहिलें. त्यांना शिव्या देऊन आम्हीं धन्यता मानतों. पण कितीतरी कथाबीजें आम्हीं मातीमोल करतो हें आम्हीं विसरतों. अखेर अनुभव घेण्याची तयारी हीच सर्वांत महत्वाची गोष्ट आहे. मराठी कथा विकसित व्हायची असली तर मराठी मनें विकसित झालीं पाहिजेत. आणि त्यासाठीं खुल्या मनानें उघडया डोळ्यांनीं, मनाची अभेद अशी स्थिति राखून भटकणें आवश्यक आहे. कलावंताचें मन हें टिपकागदासारखें असायला हवें. पाणी, रक्त, शाई सारें कांहीं शोषून घेणारें! जिरविणारें!

मला नेहमींच असें वाटत आलें आहे कीं, कलावंतानें नेहमी अतृप्त असावें. असमाधान हींच त्याची खरी प्रेरकशक्ति आहे. जीवनांत अभ्यासण्यासारखें, शिकण्यासारखें, पाहण्यासारखें, सांगण्यासारखें, कांहींच नाहीं असें ज्याक्षणीं वाटेल त्याक्षणीं माणसाची जीवनावरची, कलेवरची, जीवनांतल्या सौंदर्यावरची श्रध्दाच मुळांतून उन्मळून पडेल. आतां जिंकण्या सारखें कांहीं राहिलें नाहीं म्हणून शिकंदर ढसाढसा रडला असें म्हणतात. यांत मानवी महत्त्वाकांक्षेइतकीच 'करण्यासारखें कांहींच उरलें नाहीं' ही मानवी खंतही आहे असें मला वाटतें. आणि म्हणूनच कलेवर श्रध्दा असणारांनीं ही अतृप्ति मिळवली पाहिजे. 'बन चुके' मानणारा कलाकार लवकर संपतो. अनुभवांचें वेड घेतलेला, त्याच्या ध्यासानें अस्वस्थ होणारा कलाकारच अखेर जीवनाशीं एकनिष्ठ राहतो. त्याचा अनुभव चिरनव राहतो. त्याची कला अजर–अमर राहते. ही श्रध्दा कारागिरीवरच्या श्रध्देंतून मिळणार नाहीं लोकप्रियतेचे 'फॉर्म्युले' वापरूनही साधणार नाहीं. लौकिक यशापयशाचें गणित मांडूनही हें विश्वरूपदर्शन घडणार नाहीं. ह्या साधनेची किंमत मोठी आहे. त्याचें देणें असेल तें देऊन टाकण्याची तयारी साधकानें केलीच पाहिजे. एरव्ही जीवनही विकसित होणार नाहीं. मोठें होणार नाहीं आणि त्यामुळेंच कलाही मोठी होणार नाहीं.

असामान्याचा वेध आणि त्याचें वेडच अखेर असामान्य कलाविश्व घडवं शकेल ही श्रध्दा आपणांला सुयोग्य दिशा दाखवणार आहे.

•••



अनुक्रमणिका

# मत्स्यगंधा

•ज्यांच्याकडे आजची मराठी रंगभूमी सार्थ आशेनें आणि अभिमानानें पाहूं शकते अशा नाटककारांमध्यें प्रा. वसंत कानेटकर यांचें नांव कधींच जाऊन वसलें आहे. 'वेड्याचें घर उन्हांत' या पहिल्याच नाटकानें त्यांच्या विपयींच्या अपेक्षा निश्चित केल्या. आणि 'रायगडला जाग येते' या नाटकानें त्यांचें यश धवलकीर्त झालें. 'रायगडला जाग येते' हें नाटक अनेक अर्थानीं गाजलें. त्यावर अनुकूल, प्रतिकूल चर्चाही झाल्या. इतिहासाचे दाखलेही काढले गेले. पण नाटकांतलें ऐतिहासिक सत्य वा पौराणिक सत्य हें त्या नाटकांत व्यक्त झालेल्या कलात्मक सत्यापेक्षां कांहीं प्रमाणांत वेगळें असणारच हें आपण गृहित धरलें पाहिजे. ऐतिहासिक वा पौराणिक नाटक म्हणजे ऐतिहासिक सनावली नव्हे. वा घटनांची जंत्री नव्हे. त्या घटनांतून कांहीं अन्वयार्थ लावून नाटककार त्याला भासलेलें एक नवें भावसत्य सांगण्याचा प्रयत्न असलेल्या नाटकांतून करीत असतो. "रायगडां"त प्रा. कानेटकर यांनीं त्यांना भासलेलें एक भावसत्य सांगण्याचा प्रयत्न केला आहे. तें सान्यांनाच पटेल वा पटावें असें नसलें तरी त्या नाटकानें एक वेगळा इतिहास घडविला खास !

'मत्स्यगंधा' हें कानेटकरांचें नवें नाटक ! पौराणिक कथेवर आधारलेलें; पण सार्वकालिक असा सिद्धांत ठसविण्याचा प्रयत्न करणारें ! राजा शंतनु, त्याचा पुत्र देवव्रत, धीवराची कन्या सत्यवती, देवव्रतानें स्वयंवरांत जिकून आणलेली अंबा आणि हिमालयांत तपश्चर्येसाठीं निघालेला, पण सत्यवतीच्या मोहांत पडलेला पराशर यांची मुख्यतः ही कथा. तशी ही कथा आपल्या परिचयाचीच; पण त्यांत कानेटकरांनीं एक फार मोठा विचार सांगण्याचा प्रयत्न केला आहे. अखेर जीवनांतली साधुता आणि स्वातंत्र्य ह्यांच्यावरची माणसांची श्रद्धाच जर संपुष्टांत आली तर जीवन शून्यवत् होईल. जीवनाचा आधार, जीवनाची प्रेरणा नाहींशी होईल असें सांगण्याचा प्रयत्न कानेटकरांनीं ह्या 'भीष्म' कथेच्या द्वारें केला आहे. जीवनांतल्या कटु अनुभवांतून व्यवहारी सौदेवाजीवर माणसांची श्रद्धा वसते. आणि मग कांहीं मूल्यच उरत नाहीं. भोंवतीं श्रद्धेय, वंदनीय कांहींच दिसत नाहीं. पण कुठें तरी त्या भव्य–दिव्याचा साक्षात्कार घडतो आणि मग माणूस त्या देवत्वाला वंदन करतो.




"दीपावली"च्या अनेक वाचकांच्या आग्रहावरून हें नाट्यविषयक नवें सदर चालू अंकापासून सुरू होत आहे. रंगभूमीवर वेळोवेळीं अवतरणाऱ्या नाटकांचा प्रांजळ व परखड परामर्ष श्री. अभिनवगुप्त त्यांतून घेतील.

हिमालयावर तपश्चर्या करावयास पराशर निघालेला असतो. त्याला सत्यवती दिसते आणि तो तिच्यावर मोहित होतो. त्या मोहांतून सत्यवतीला गर्भ राहतो. धीवर तिला त्या मोहांतून परावृत्त व्हायला सांगतो, त्यावेळीं ती त्याला आपला निश्चय सांगते. परंतु पराशराला जाग येते आणि तो हिमालयांत निघून जातो. जातांना सत्यवतीची तो त्या कलंकित कौमार्याच्या-शापांतून मुक्तता करतो. आपल्या मुलाला सांभाळण्याचें वचन तो तिला देतो. तिचें कौमार्य तिला पुनश्च प्राप्त होईल असें अभिवचन तो तिला देतो.

पराशराच्या ह्या अनुभवांतून भावड्या सत्यवतीचें परिवर्तन घडतें. सत्यवतीचीं तीन परिवर्तनें म्हणजे तीन अंक ! पहिल्या अंकांत ती प्रेमळ, भावडी, कोमल मनाची दाखविली आहे. दुसऱ्या अंकांत ती रुक्ष, व्यवहारी दाखविली आहे आणि तिसऱ्या अंकांत भीष्माच्या ठिकाणच्या देवत्वाच्या साक्षात्कारानें, गमावलेल्या साऱ्या श्रद्धा परत मिळाल्या आहेत या आनंदानें परिवर्तित झालेली सत्यवती आपणांस भेटते. दुसऱ्या अंकांत सत्यवतीवर मोहित झालेला शंतनु आपल्याला दिसतो. "सौदा" ह्या व्यवहारी सिद्धांताचा स्वीकार केलेली सत्यवती त्याला पेंचांत पकडते. पण देवव्रतावर अन्याय होईल म्हणून राजा त्या अटी मान्य करीत नाहीं. देवव्रताला ती वेदना कळते. देवव्रत सत्यवतीच्या दोन्ही अटी मान्य करतो. आपला गादीवरचा हक्क तो सोडून देतो आणि आपल्या वंशजानें गादीचा हक्क सांगूं नये म्हणून आजन्म ब्रह्मचर्यपालनाची तो प्रतिज्ञा करतो. आणि शंतनु–सत्यवतीचें मीलन होतें. शेवटच्या अंकांत आपल्या सापत्न भावासाठीं–विचित्रवीर्यासाठीं–भीष्म (देवव्रत) तीन राजकन्यांचें हरण करून आणतो. पण त्यांतली अंबा ही आपण शाल्वराजाला मनानें वरलें आहे असें सांगते म्हणून तो तिला शाल्वाकडे पोंहोंचवितो. परंतु तो तिचा स्वीकार करीत नाहीं. त्यावेळीं अंबा आणि सत्यवती देवव्रतानें हिच्याशीं लग्न करावें म्हणून प्रयत्न करतात. भीष्म निश्चयापासून ढळत नाहीं. सर्व प्रश्नांचीं उत्तरें तो समर्थपणें देतो आणि सत्त्वासाठीं पडणारी जबर किंमत देण्याचें दायित्व स्वीकारतो. तिसऱ्या अंकांतील सत्यवती, अंबा व भीष्म यांच्यांतले संवाद बुद्धि आणि भावना यांना गदगदां हलवून सोडतात. "कुरुवंशाच्या भवितव्यापेक्षां कां तुझी प्रतिज्ञा श्रेष्ठ आहे ?" असं सत्यवती विचारते तेव्हां भीष्म म्हणतो, "माते, एका भीष्मानें नकार दिला म्हणून कुरुवंशाचें भवितव्य कांहीं बदलणार नाहीं. पण भीष्माच्या पतनानें मात्र माणसाचं सत्त्व खचित डळमळेल. जिथें पराशर लटपटला, सम्राट् शंतनु उन्मळला तिथें भीष्मही डळमळला








तर या जगांत स्त्रीनें कोणा पुरुषाचा विश्वास धरावा ? माते, कुरु वंशाच्या भवितव्यापेक्षां, पराशराच्या प्रणयिनीची, शंतनूच्या अर्धांगीची आणि देवव्रताच्या मातेची जीवनावरली श्रद्धा भीष्माला अधिक श्रेष्ठ वाटते." पुढें अंबेला तो म्हणतो "या राजगृहांत घट्ट मुळें रोंवून भीष्म एखाद्या गर्भिणीसारखा स्वतःच्या सत्त्वावर माणसांना घडवीत उभा आहे. माते, मला सांग भीष्माच्या प्रतिज्ञेचा भंग होईल त्यादिवशीं साधुत्वाला आणि सदाचरणाला संधिसाधूपणापलिकडे दुसरा कांहीं अर्थ उरेल कां ? प्रियदर्शना, अरे भीष्म हीच सत्यवतीची, श्रद्धा आणि भीष्म हाच अंबेचा मानबिंदू ! अरे, या जगांत भीष्माची मान मोडेल तर कुणाची मान ताठ राहील ? शेवटीं अंबेला तो आपला पराभव देतो. आणि आपला मृत्यूही देतो. एका सत्त्वशील माणसाची तेजस्वी कथा संपते.

हें नाटक आपल्याला एका वेगळ्याच उंचीवर घेऊन जातें. वैचारिक मंथन तें घडवून आणतें. गोवा हिंदु असोशिएशनच्या वतीनें तें रंगभूमीवर आलें. मा. दत्तारामांसारख्या गुणी व कर्तबगार दिग्दर्शकानें तें बसविलें. जितेंद्र अभिषेकींनीं त्याला संगीताचा साज चढविला. मा. दत्ताराम (भीष्म), श्रीपादराव नेवरेकर (शंतनु), रामदास कामत (पराशर) तुकाराम बापु (धीवर), भारती (अंबा) व आशालता वावगांवकर (सत्यवती) यांनीं आपापलीं कामें ठाकठीक केलीं. सत्यवती, भीष्म, पराशर यांच्या कामांचा खास उल्लेख केला पाहिजे. सूत्रधाराच्या ऐवजीं 'वर्तमान व कालर्षि' या दोन पात्रांची योजना कल्पकतेची आहे. (विदूषक) (चंडोल) याचीही योजना पूरक ठरली आहे. पात्रयोजनेंत बदल होणें शक्य वाटतें. इष्टही वाटतें. इथें नटाची कसोटी मागणारीं दोन पात्रें आहेत— भीष्म आणि सत्यवती ! मा. दत्ताराम आणि आशालता वावगांवकर या दोघांनीं त्या कमी पडूं दिल्या नाहींत खास !

एक चांगलें नाटक दिल्याबद्दल लेखक व गोवा हिंदु असोसिएशनचें अभिनंदन ! ●

# सह्याद्रीचं सोनं

कथाकार दत्ता कदम यांचें हें पहिलेंच नाटक. कदम यांना इतिहासाचें जबर आकर्षण दिसतें. नुकताच त्यांचा ऐतिहासिक कथांचा संग्रह 'सूर्यालाही उगवावं लागतं' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. हाच इतिहासाची वारसा त्यांनीं "सह्याद्रीचं सोनं' ह्या नाटकांतही चालविला आहे. संताजी घोरपडे आणि धनाजी जाधव यांच्यातील संघर्षाची व त्यांतून घडलेल्या संताजीच्या वधाची कथा ह्या नाटकांत सांगितली गेली आहे. संताजी-धनाजी ही वास्तविक स्वराज्याची फार मोठी शक्ति होती. परंतु धनाजीच्या मनांत कलि शिरला. बारीक सारीक मतभेदांतून भांडणें सुरू झालीं. स्वराज्याच्या शत्रूंनीं याचा फायदा घेतला. दोन मित्र एकमेकांचे वैरी झाले. आणि अखेरीस संताजीसारखा मोहरा एकाकीपणें मारला गेला. कथा भाग येवढाच ! त्यासाठीं योजिलेलें प्रसंग व फुलविलेलें नाट्य याचीच प्रामुख्यानें चर्चा व्हायला हवी. स्वराज्यासाठीं समर्पण भावनेनें, तडजोड न करतां लढण्याची जिद्द संताजीची ! वृत्ती तडफदार, बोलणें रोख-ठोक वागणें आडपडद्याचें नाहीं असा मनमोकळ्या स्वभावाचा संताजी नाटककारानें गृहित धरला आहे. इनामी वतनें देण्याच्या कल्पनेला त्याचा विरोध होता. धनाजी वयानें मोठा, भावडा, संताजीवर प्रेम करणारा; पण इनामी वतनें दिल्याशिवाय स्वराज्याला निष्ठावंत माणसें मिळणार नाहींत अशी त्याची व्यवहारी भूमिका. संताजीनें मोंगलांच्या डेऱ्याचे कळस कापून आणले या त्याच्या पराक्रमी कृत्यामुळें त्याला सेनापतिपद दिलें जातें. पण वयानें ज्येष्ठ व पराक्रमानेंही थोर अशा धनाजीकडे तें येत नाहीं. या सर्व संधीचा फायदा नागोजीराव माने उठवितो आणि हलक्या कानाचा भावडा धनाजी त्याच्या जाळ्यांत सांपडतो. त्याची चूक त्याला उमगते. पण फार उशिरां. संताजीचें मोठेपण मात्र त्याला नवी दृष्टि देऊन जातें.

संताजी, धनाजी या दोन व्यक्तिरेखांना पुष्कळच चांगलें 'व्यक्तित्व' लाभलें आहे. दोघांच्या स्वभावविशेषांतील विसंवादांतून संघर्षाची निर्मिति चांगली झाली आहे. नागोजीराव माने याच्या खलत्वाची व त्याच्या डावांची कल्पना पहिल्याच प्रवेशांत सूचित करण्यांत नाट्य चांगलें आलें आहे. 'दोन कुटुंबांतला एकोपा सूचित करणाऱ्या प्रसंगांची गुंफण, संताजीचें एकलेपण, त्याच्या मोठ्या मनाची मोठी वेदनाही चांगली रंगविली आहे. धनाजी सेनापति झाल्यानंतरचा त्याच्या मनांतला कोलाहल व त्यानंतरचा रामचंद्रपंत अमात्य आणि धनाजी यांच्यातला प्रसंग हे ह्या नाटकाचे उत्कर्षबिंदु आहेत. त्या मानानें नागोजीराव माने याचीं कारस्थानें स्पष्ट करणारे प्रसंग कमी आहेत. आहेत त्यांत विनोद व इष्क अधिक आहे 'चिमणाजी'चा 'रिलीफ' लोकांना बरा वाटतो. पण हें पात्र केवळ 'रिलीफ' साठीं आहे कीं, त्याच्या द्वारें नागोजी हेरगिरी करवून घेतो तें अधिक स्पष्ट व्हायला हवें होतें. तिसऱ्या अंकांत संताजीच्या मनाची तगमग, तडफड, त्याचें वैराण आयुष्य हें रंगमंचावर दिसतच नाहीं. त्यामुळें संघर्षांतला एक प्रभावी दुवा कच्चा राहतो असें वाटतें. संवादांची भाषा मोठी प्रसन्न व रसानुकूल आहे. विनोदी प्रवेश चांगलेच रंगतात. संताजी—धनाजी, राजाराम—संताजी, पंत—धनाजी ह्या प्रवेशांत तर संवादांची फेंक अतिशय समर्थपणें झाली आहे, नाटकाची बांधणी अजूनही पक्की होऊं शकली असती, असें मात्र म्हणावेसें वाटतें.

प्रयोगांत नांव घेण्यासारखीं माणसें दोनच—सूर्यकान्त (संताजी) वामनराव पटवर्धन -(धनाजी) ! त्यांतल्या त्यांत वामनराव पटवर्धन उजवे ! त्यांनीं धनाजीच्या स्वभावाचे बारकावे आपल्या अभिनयानें चांगले दाखविले. वयाचं, व्यक्तित्वाचं 'बेअरिंग' त्यांनीं चांगलं राखलं. त्यानंतर क्रम लागतो शंकर घाणेकर (चिमणाजी) यांचा. प्रत्येक नाटकांत स्वतःचं (वाक्यंसुद्धां) असं कांहींतरी घाणेकर देऊन, दाखवून जातातच ! राजा पटवर्धन (नागोजीराव माने) रंगला नाहीं. खलत्व आणि रंगेलपणा त्या पात्राचे ठिकाणीं कल्पिलेला आहे. पण पटवर्धन फार कमी पडले. चित्राही प्रभाव पाडूं शकली नाहीं. बाकीची पात्र-योजना (नारो महादेव सोडून) चुकीची होती हें नमूद केलेंच पाहिजे. रायाजी, राजाराम ही त्याचीं प्रमुख उदाहरणें ! त्यामुळें नाटकाची 'टीम' जमली नाहीं. दोन चार चांगलीं पात्रें व बाकीचीं 'असलीं' पात्रें घेऊन नाटकाच्या रंगतींत फार अंतर पडतें हें निर्मात्यांनीं ध्यानीं घेणें अगत्याचें आहे. संगीत व पार्श्वसंगीत चांगलें होतें. नवीनपणाचे कांहीं वर निर्देशिलेले दोष सोडले तर नाटककार म्हणून दत्ता कदम यांच्यासंबंधीं रंगमंचानें चांगल्या अपेक्षा करायला हरकत आहेसें वाटत नाहीं.

—अभिनवगुप्त.

अनुक्रमणिका

# कलेकरतां कला कीं प्रचारासाठीं....?



**मोसम** केव्हांच संपून गेला. कवित्वहि ओसरत आलें आहे. आतां थोडा शांतपणें तटस्थपणें विचार करतां येईल. एव्हांना चित्रपटांची वहुतेक सारीं पारितोषिकें जाहीर करून झालेली आहेत. फिल्म जर्नालिस्ट असोसिएशन्स, सिनेगोअर्स असोसिएशन्स इत्यादि इत्यादि अनेक संघटना दरवर्षी वर्षातील सर्वोत्कृष्ट चित्रपट म्हणून दहापांच चित्रपटांना पारितोषिकें देत असतात. पण या सगळ्या पारितोषिकांत मानाचा तुरा मानला जातो तो सरकारी पारितोषिकांचा! आणि म्हणूनच या पारितोषिकांविषयींची उत्सुकता जेवढी जवर तेवढा निकाल घोषित झाल्यानंतर वसणारा धक्काहि जवर असतो!

सारे निकालाची वाट पहात होते. महाराष्ट्र राज्यसरकारनें आयोजित केलेल्या चित्रपट महोत्सवाच्या निकालाची. आणि अखेर एकदिवस खरोखरच निकाल लागला! निकालाची घोषणा ऐकतांच सगळ्यांना अगदीं जवर धक्का वसला. या धक्क्याचें स्वरूप इतकें मोठें होतें कीं, 'महाराष्ट्र टाईम्स' सारख्या मातव्बर नियतकालिकालाहि आपल्या अग्रलेखाचे स्तंभ सरसावून मनांतली तळमळ व्यक्त केल्याशिवाय राहवलें नाहीं.

या चित्रपट महोत्सवांत यंदा 'रंगल्या रात्री अशा' हा चित्रपट सर्वोत्तम ठरला गेला. या घटनेवद्दल, खरें म्हणजे कुणास कांहीं फारसा खेद व्हायला नको. कारण चित्रपट महोत्सव हा प्रत्येक वर्षी भरवला जाणारा उरुस आहे. या उरुसांत कोणातरी एकाला इनाम द्यायचेंच असतें. यंदा 'रंगल्या रात्री अशा' हाताशीं सांपडला. यांत वाईट वाटून घेण्यासारखें काय आहे वरें ?

दुसरें असें कीं, या वार्षिक महोत्सवांत जे चित्रपट भाग घेतात त्यांत वरा ठरणाऱ्या चित्रपटाला पारितोषिक दिलें जात असतें. म्हणजे मैदानांत उतरलेल्या पैलवानांचाच इथें विचार करायला हवा. घरांत वैठकीवर वसून राहणाऱ्याचा नव्हे ! याचाच अर्थ असा कीं' हा सरकारी वार्षिक सन्मान मिळवायला चित्रपट चांगलाच असला पाहिजे असें नाहीं. तर जमलेल्या घोळक्यांत जरा उठून दिसतां आलें म्हणजे झालें ! एवढें एकदां मान्य केलें की पुढचें कसें सुरळीत होतें!

परीक्षकांना दोष काय म्हणून द्यावा ? परीक्षकांची चूक असली तर एवढीच कीं, उडदामाजी काळेगोरे निवडण्याचा त्यांनीं अट्टाहास केला. स्पष्टच सांगायचें म्हणजे अख्ख्या महाराष्ट्र राज्य चित्रपट महोत्सवांत पारितोपिक देण्यालायक एकहि चित्रपट नव्हता. सर्वोत्कृष्ट म्हणून सन्मान करावा असा एकहि दिग्दर्शक नव्हता. एकहि नट, नटी, किंवा संगीत दिग्दर्शक नव्हता. आणि तरीहि परीक्षकांनीं मारून मुटकून एकएक वुजगावणें उभें केलें. हीच परीक्षकांची चूक.

या महोत्सवांतच माणूस, रामजोशी, संत तुकाराम यांच्यासारखे जुने चित्रपट दाखविण्यांत आले. या चांगल्या चित्रपटाची पारितोषिकाचा हेतु मनांत धरून आलेल्या चित्रपटांशीं तुलना केली तर काय अनुभवाला येतें! माणूस, तुकाराम यांना झालेला कलेचा स्पर्श स्पर्धेतील एका तरी चित्रपटाला झाला होता का ?

कोणत्याहि कलेवावत खरें म्हणजे तरतमाचा वापर करतां येत नाहीं. कलाकृति ही एकतर श्रेष्ठ असते. किंवा कनिष्ठ असते. चित्रपट एकतर चांगला असतो किंवा वाईट असतो. माणूस, तुकाराम हे चांगले चित्रपट आहेत. त्यांच्या जोडीला परितोपिक-विजेतें चित्र बसू शकत नाहीं मग या चांगला नसलेल्या चित्रपटांना पारितोषिकें देण्याचा परीक्षकांचा आग्रह कां ? चित्रपट चांगला नसेल तर पारितोषिक देऊं नये अभिनय चांगला नसेल तर पारितोपिक देऊं नये. नाहीं दिलीं पारितोपिकें तर प्रलय होत नाहीं. चित्रपटसृष्टी वुडून जात नाहीं. उलट अशीं खोटीं वक्षिसें दिलीं नाहींत तर, दिग्दर्शक, नट, संगीतदिग्दर्शकांचा स्वत:विषयीं उगाचच गैरसमज व्हायचे टळेल आणि त्याचवरोवर चित्रपटसृष्टीवरचें घोर संकटहि !

पण मला वाटतें आमचेंच कांहीं चुकत असावें! कारण आमचीं मूल्यें आणि परीक्षकांचीं मूल्यें यांत जमीन अस्मानाचा फरक आहे. 'चांगलें' आणि 'वाईट' या मुळीं त्यांच्या निवड–कसोटयाच नाहीत ! आणि असल्याच तरी चांगलेपणाच्या व वाईटपणाच्या त्यांच्या कल्पनाच कांहीं वेगळ्या असल्या पाहिजेत.

खरें नाहीं वाटत का आमचें म्हणणें ! तेव्हां मग आतां तुम्हांला दिल्लीदरवारातील सुरस आणि चमत्कारिक कथाच सांगितली पाहिजे.

दिल्लीदरवारांत यंदा सर्वोत्तम वार्षिक सन्मानाची माळ 'शहर और सपना' या चित्रपटाच्या गळ्यांत पडली. ही वार्ता ऐकली आणि सगळेच चकित झाले. स्तंभित झाले. आम्ही तर विस्मयानें दिङ्मूढच होऊन गेलो. हें कांही तरी अघटितच घडलें होतें. कोणाच्याहि ध्यानींमनींच काय पण स्वप्नींही नसलेल्या चित्रपटाला राष्ट्रपति सुवर्णपदक मिळालें होतें. निकाल अधिकृतपणें घोषित होईपर्यंत 'शहर और सपना'ला हा सन्मान मिळेल असें वाटत नव्हतें. कारण 'वंदिनी' किंवा 'महानगर' यांच्यापैकी कुणातरी एकाला हे पारितोषिक मिळणार असें 'विश्वसनीय गोटांतून' वृत्त होते. 'महानगर' वर अँग्लो इंडियन समाजाच्या भावना दुखावल्याचा आरोप करण्यांत आला होता. या आरोपाचें निराकरण झालें तर 'महानगर'च सुवर्णपदक मिळवणार आणि हें निराकरण झालें नाहीं तर 'वंदिनी' वक्षिस मिळवणार होतें. पण हें खात्रीलायक वृत्त सपशेल







अविश्वसनीय ठरले. आणि अखेर रेस जिंकली ती अब्बासच्या तट्टानेंच !

अब्बास साहेबांचा हा चित्रपट सुवर्णपदकास योग्य ठरला या वातमीवर बराच वेळपर्यंत आमचा विश्वास बसत नव्हता. त्याचीं कारणेंहि तशींच होतीं. 'शहर और सपना'चें तट्टू मुंबईत चित्रपटनिवडीच्या पहिल्या फेरींतच [redacted] गळतां बचावलें होतें ! मुंबईतील प्राथमिक निवड समितीच्या बहुतेक सदस्यांना या चित्रपटाला 'साम्यवादाचा वास' आला होता. 'लेफ्टीस्ट टेंडन्सी'चा वास मारणाऱ्या या चित्रपटाला पहिल्या फेरींतच डिच्चू मिळावा असा या परीक्षकांचा आग्रह होता. पण, या निवडसमितीत चुकून एका जाणत्या परीक्षकाचाहि अंतर्भाव केला गेला होता. (हा बहुधा अपघातच!) या परीक्षकाला चांगलें आणि वाईट कळत होतें. त्यानें आपलें सगळें सामर्थ्य पणास लावून 'शहर और सपना'ची तळी उचलून धरली. आपलें वजन खर्ची घातलें. तेव्हां कुठें इतरांनीं त्याचा दिल्लीच्या या यादींत नाराजीनेंच समावेश करून घेतला. शेवटचा सहावा चित्रपट म्हणून ! आणि अखेर चित्रपट दिल्लीच्या वाटेला लागला.

मुंबईत असें झालें. मग दिल्लीनें तरी मागें कां राहावें! तिथल्या परीक्षकांनीं अगोदर पहिल्या तीन चित्रपटानांच अंतिम निवडीसाठीं स्वीकारण्याचे ठरवलें. पण, मग काय कळ फिरली कुणास ठाऊक! त्यांनीं सारेच चित्रपट पाहिले. 'शहर और सपना' तिथल्याहि यादींत शेवटून पहिलाच राहिला. दिल्लीच्या दरबारी परीक्षकांचेंहि घाणेंद्रिय तिखट होतें. 'शहर और सपना'ला त्यांनाहि 'लेफ्टीस्ट टेंडन्सी'चा वास आला होता. 'महानगर' यादींत पहिला होता. पण, त्याच्यावर होता आक्षेप! ज्या चित्रपटावर असा आक्षेप येतो तो तरी सर्वोत्तम कलाकृती कसा मानला जावा ?

पण, तिथेंहि कुणी एक जाणकार होता. त्यानें कंबर कसली. कोणत्याहि कलाकृतीची श्रेष्ठकनिष्ठता तिच्यांतील राजकीय तत्त्वज्ञानावर ठरवूं नका, तर तिचीं कलामूल्यें विचारांत घ्या, असा त्यानें आग्रह मांडला. 'क्रेन्स आर फ्लाईंग', 'बॅलड ऑफ ए सोल्जर' 'दि चाइल्डहूड ऑफ आयव्हान' या रशियन चित्रपटांना पॅरिस, इटाली, इतकेंच नव्हे तर चक्क अमेरिकेंतसुध्दां पारितोषिकें मिळालीं आहेत हें त्यानें परीक्षकांच्या नजरेस आणून दिलें. त्या जाणकार परीक्षकाचा वचक म्हणा किंवा फ्रान्स,अमेरिकेच्या उदाहरणांचा परिणाम म्हणा; 'शहर और सपना' पुन्हा सगळ्या परीक्षकांनीं पाहिला आणि राष्ट्रपति सुवर्ण पदक 'शहर और सपना'ला देण्यांत आलें.

याच संदर्भात आणखीहि एक गम्मत आम्हांला कळली आहे. मुंबईहून प्राथमिक निवड होऊन चित्रपट दिल्लीच्या वाटेवर लागले त्याच वेळी एक चित्रपट निर्माताहि दिल्लीकडे पोचला म्हणतात! आणि हा निर्माता साऱ्या परीक्षकांना भेटून जमेल तसें सांगत होता कीं, 'शहर और सपना' साम्यवादी चित्रपट आहे. पारितोषिकासाठीं त्याचा विचार करूं नका. इतकेंच नव्हे तर तो पाहूंहि नका. आणि खरोखरच 'शहर और सपना' दाखवण्यांत आला त्यावेळीं परीक्षक समितींतील फारच थोडे सभासद चित्रपटगृहांत हजर होते. आणि म्हणून तर पुन्हा दुसऱ्यांदा हा चित्रपट दाखवावा लागला. आता बोल. !

आणि आता हें एवढें रामायण सांगूनहि, चित्रपटाच्या निवडीसाठीं परीक्षक कोणत्या कसोट्या वापरतात, हें तुमच्या ध्यानांत आलें नाही तर त्याला आमचा काय इलाज !

* * *

'ऑस्कर' पारितोषिकांचीहि यावर्षीची धांवपळ संपली आहे. या पारितोषिकांच्या निकालांनीहि, फार मोठा नसला तरी, धक्का दिला आहे. यंदा ऑस्करचा निकाल जास्तीत जास्त कांटेकोर कसा लागेल याबाबत कसोशीनें प्रयत्न करण्यांत आले होते. आणि म्हणूनच सिडने पॉयटर या नीग्रो नटाला सर्वोत्तम अभिनयासाठीं पारितोषिक मिळूं शकलें. 'लिलीज् ऑफ दि 'फिल्ड' या चित्रपटांतील भूमिकेबद्दल त्यानें हें पारितोषिक मिळवलें. आजपर्यंतच्या ऑस्करच्या छत्तीस वर्षांच्या इतिहासांत एका निग्रो अभिनेत्याला हा मान पहिल्या [redacted] यंदा मिळाला आहे. गौरवर्णीयांच्या मनांत नीग्रोंबद्दलची जी तुच्छता वास करीत आहे तिच्या पार्श्वभूमीवर सिडने पॉयटरचें यश अधिक उजळून दिसतें. त्याची भूमिका असलेला 'लिलीज् ऑफ दि फिल्ड' नुकताच मुंबईत प्रदर्शित झाला होता. अप्रतिम कथा, उच्च निर्मितीमूल्यें आणि कथेची दिग्दर्शकानें केलेलीं हळुवार भावपूर्ण हाताळणी ही या चित्रपटाची आणखी मोलाची विशेषता होय. आमच्या चित्रपट दिग्दर्शकांना 'लिलीज् ऑफ दि फिल्ड' किंवा गतवर्षींचा 'वेस्ट साईड स्टोरी' यासारख्या चित्रपटांतून खूप कांही शिकतां येण्यासारखें आहे.

यंदा सर्वोत्तम चित्रपटाचें 'ऑस्कर' मिळवलें 'टॉम जोन्स'नें. 'क्लिओपात्रा' सारखा भव्य आणि गाजलेला चित्रपट त्याच्याशीं स्पर्धा करीत होता. आणि 'ऑस्कर' मध्ये गेल्या कांहीं वर्षांत भव्य चित्रपटांनाच पारितोषिकें द्यायची जी अनिष्ट लाट उसळली होती, त्यामुळें तर 'क्लिओपात्रा'ला आणखीच उजळ भविष्य होते. गेल्या कांही वर्षांत 'टेन कमांडमेंटस्', 'बेनहर', यासारख्या पोषाखी, नेत्रदीपक चित्रपटांनीं 'ऑस्कर' मारून नेले होते. त्यावर टीकाकारांनीं टीकेचे काहूर उठविलें होते. त्या टीकेकडे दुर्लक्ष न करता यंदा परीक्षकांनी अधिक कांटेकोरपणे निवड केली. आमच्या परीक्षकांना यापासून शिकण्यासारखें कांहीं नाही का ?

—वसु भगत.

**दीपावली बुद्धिबळ क्र. ७ चे यशस्वी स्पर्धक**

१) सुरेंद्र आमोणकर (पणजी)
२) प्रकाश ग. करंदीकर (भुसावळ)
३) कु. शैला वा. कुलकर्णी (इगतपुरी)
४) कु. मीनाक्षी स. वासुरकर (चिपळूण)
५) विकास व. महाशब्दे (विलेपार्ले)

# काश्मीरचें कोडें–

दीपमाला

'शब्दकोड्यां'वर 'मार्मिक' प्रहार झाल्यामुळें कोड्यांचें जीवन मोठें धोक्यांत आलें आहे. 'शब्दकोड्यां'-वर वंदी घालण्यांत यावी अशी ही मागणी पुन्हां पुन्हां करण्यांत येत आहे. मागेंही अशी मागणी करण्यांत आली होती. पण माणसाच्या मनांतली 'जुगार', 'दैव', 'दैवाचा कौल' ह्या वावतींतली सनातन भावना अखेर प्रत्येक वेळीं विजयी होत गेली. कोड्यांनीं नांवें वदललीं–अनेक रूपें घेतलीं. पण कोड्यानें आपलें तत्त्व सोडलें नाहीं. त्या साऱ्या टीकाप्रतिटीका पचवून माणसाच्या मनांतल्या 'जुगारी' भावनांना साद घालण्याचें त्यांचें कार्य चालूंच आहे. स्वत:च निर्माण केलेल्या कोड्यांत कोड्याचे 'धनी' कधीं सहसा सांपडत नाहींत. त्यांनींच तें निर्माण केलेलें असल्यानें त्या कोड्याचें शंभर टक्के उत्तर त्यांना ठाऊक असतें. इतरांचीं नशिवें कसोटीला लागत असतांना कोडें मालकाचें नशीव नेहमींच शिकंदर ठरत असतें.

हा झाला सामान्यपणें, सामान्य कोड्यांच्या वावतींतला व्यवहार ! पण असामान्यांनीं निर्मिलेल्या असामान्य कोड्यांचें सारें कांहीं आगळेंच असतें. त्याचे नियम वेगळे, त्याचें मूल्य वेगळें, त्याचें वक्षीसही वेगळें. शब्दकोड्यांच्या वक्षीसाची 'ह जा री" भाषा इथें चालंत नाहीं. हीं असलीं कोडीं नेहमीं लाखांच्या वा कोटींच्या भाषेंत वोलत असतात. सामान्य कोड्यांतलीं अपेशी माणसें कांहीं जीवनांतून उठत नाहींत. पण असल्या कोड्यांतून मात्र कांहीं लाखांची नुकसानी पत्करून माणसें जीवनांतून उठतात. कोडें सोडवणारींच नव्हेत, तर घालणाऱ्यासगट कांहीं निष्पाप, निरपराध, माणसेंही यांतून वांचत नाहींत. त्या कोड्यांशीं त्यांचा प्रत्यक्ष संवंध आलेला असो वा नसो.

'काश्मीरचें कोडें' हें असें एक कोडें आहे. सर्वसामान्यपणें चक्रव्यूह रचणाराला व्यूहभेद' ठाऊक असतो. असावा लागतो–परीक्षकाला प्रश्न पत्रिकेंत त्यानेंच घातलेल्या प्रश्नाचें उत्तर ठाऊक असतें –असावें लागतें. एव्हरेस्ट गांठूं इच्छिणाऱ्याला त्याची भौगोलिक माहिती असावी लागते. हवामान, वर्फ वगैरेंशीं त्याचा परिचय असावा लागतो अशी सामान्य अपेक्षा आपण करतों. पण सोळा वर्षांपूर्वी पाकिस्तानी टोळीवाल्यांच्या स्वारीच्या निमित्तानें आपल्या राज्यकर्त्यांनीं एक कोडें स्वत:ला घालून घेतलें. सर्वसाधारणपणें राजकारणांत कोडीं दुसऱ्याला घालावयाचीं असतात. .कोंडी दुसऱ्याची करावयाची असते. फसवणूक–शत्रूची फसवणूक हा राजकारणी धर्म मानला जातो. पण आपलें सारेंच वेगळें आहे. उच्च व स्वर्गीय पातळीवरचें आहे. त्यामुळें आम्हीच कोडीं घालतों. आणि त्यांत अडकतों आम्हींच ! नवीं नवीं कोडीं उत्पन्न करतोंही आम्हींच ! "काय झकास 'कोडें' घातलें आहे !" या विचारांत रममाण होतोंही आम्हींच आणि मग कोड्यांतल्या पराभवावावतही 'पंडिती' पद्धतीची वा 'शास्त्री'य पद्धतीचीं भाषणें ही करतों आम्हींच ! काश्मीरचें कोडें आम्हींच घालून घेतलें. टोळीवाल्यांपासून संरक्षण मिळविण्यासाठीं आम्हीं सैन्य नेलें आणि मग विजयी सैनिकांना 'ठहरो' चा आदेश ही दिला आम्हींच ! रणनीतींत विजयी सेना अशा थांवल्याचें हें जगांतलें कदाचित पहिलेंच उदाहरण असेल. कार्यसिद्धि जवळ दिसत असतांना एकदम 'मार्ग वदल' केल्याचीही जागतिक राजकारणांतील ही पहिलीच वेळ असेल. 'न्यूयॉर्क' मध्यें मुलाखत देतांना श्रीमति इंदिरा गांधी यांनीं यावावतच्या चुकीची प्रकट कवुली दिली. पण नुसती कवुली देऊन कार्यभाग होत नाहीं. अंगभूत घोरणांत (वचनांत नव्हे) जोंपर्यंत वदलाचा प्रत्यय येत नाहीं तों पर्यंत विश्वास ठेवणें कठीण जातें.

शेख अब्दुल्ला कोण आहेत ? काश्मीरचे मुख्य मंत्री ? काश्मीरचे लोकनेते ? काश्मीरचे एकमेव प्रवक्ते ? काश्मीर ही त्यांची वैयक्तिक इस्टेट आहे कीं त्यांची ती खाजगी वतनदारी आहे ! आम्ही 'अब्दुल्लां'शीं वोलत आहोंत म्हणजे नेमक्या कुणाशीं वोलत आहोंत ? तिथें सदर इ रियासत नामक राज्यप्रमुख आहेत ? तिथें मुख्यमंत्री आहेत ? असेंव्ली आहे तिथें लोकनियुक्त प्रतिनिधी तिथें गेलीं १५।१६ वर्षें कांहीं शासन चालवीत आहेत ? ह्या अनेक प्रश्नांचीं मनोमन उत्तरें देणें आवश्यक आहे. शेख अब्दुल्लांचें महत्त्वपूर्ण स्थान मान्य करूनही ते ज्या पद्धतीनें वागत, वोलत आहेत ती पद्धत–अत्यंत अपमानास्पद आहे. काश्मीरच्या आजच्या राज्य कर्त्यांनाच केवळ नव्हे तर भारताच्या राज्यकर्त्यांनाही ती शून्यवत् करून टाकणारी आहे. जणु गेलीं सोळा वर्षें कांहीं घडलेंच नाहीं. कांहीं प्रगति झालीच नाहीं. काश्मिरी जनतेनें जर हा एकमेव अधिकार अब्दुल्लांना दिला असता तर अब्दुल्लांना अटक केल्यानंतर काश्मीरमध्यें वंड झालें असतें. नंतरच्या काळांत शांतपणें निवडणुका झाल्या नसत्या. काश्मीरी जनता गेलीं १२ वर्षें शांत होती. आमचें राज्यशासन ती मानीत होती (आजही मानते). अब्दुल्ला हे लोकनेते असले तरी आमच्या राज्याचे ते नागरिक आहेत. आमच्या राज्यकर्त्यांच्या अंगभूत चांगुलपणामुळें व सद्भावनापूर्वक प्रश्न सोडविण्याच्या कांक्षेमुळें दिल्ली दरवारीं चर्चा होत असल्या तरीही ना. छगला, कृष्णमाचारींसारख्या मंत्र्यांना त्यांनीं शून्यवत् समजून कांहीं वोलणें हें गैर नव्हे काय ? "थांवा ! मी नेहरूंशीं वोलतों आहे" असें त्यांनीं वरील मंत्र्यांना सुनावलें.



अनुक्रमणिका

यांत नेहरू-गौरव असला तरी देशगौरव खचित नाहीं. पंडितजी बोलताहेत ते ह्या राष्ट्राचे नेते म्हणून ! आणि त्यांनींच आश्वासन दिल्याप्रमाणें लोकसभेला विश्वासांत घेतल्याशिवाय त्यांना कांहीं करतां येणार नाहीं. शेख अब्दुल्ला म्हणजे अवघा काश्मीर नव्हे, हेंही सादीक यांना बजावलें आहे.

मग ह्या कोडचांतून (व कोंडीतून) सुटका व्हावी कशी ? कांहीं तत्त्व, कांहीं सिद्धांत, कांहीं श्रद्धा निश्चित केल्याशिवाय यांतून सुटका नाहीं. विलिनीकरण, सार्वमत, काश्मीर—भारत एकता, शेखसाहेबांचें नेमकें स्थान, पाकिस्तानबाबतची भूमिका ह्या बाबतचा अंतिम व निश्चयार्थ शब्द आम्हीं ठरवला पाहिजे. गेल्या १६ वर्षांत आम्हीं भरपूर कोलांट्या उड्या मारल्या आहेत. आजही शेखसाहेबांशीं बोलतांना खंबीरपणाचा अभाव जाणवतो. आमच्या ह्या अस्थिर धोरणामुळें काश्मीरमध्यें आजच एक प्रकारची पोकळी उत्पन्न झाली आहे. प्रवाशांची संख्या घटली आहे. आर्थिक व्यवहार मंदावले आहेत. कांहीं ठिकाणीं तर अन्नान्न दशेचीही चिन्हें आहेत. अखेर ह्या राजकारणी खेळानें सामान्य व निष्पाप माणसांचें जीवनच आम्हीं जणुं उध्वस्त करून टाकीत नाहीं काय ? ह्या कोड्यांतल्या विजयासाठीं 'शब्दपाटवा'पेक्षांहीं खंबोर अशा 'कृतिपाटवा'ची गरज आहे. आमचें राज्यशासन हें कृतिपाटव दाखवील काय? ●●

# चांगलें आणि मोठें :

गेल्या महिन्याच्या एक, दोन तीन तारखांना अहमदनगर येथें मराठी नाट्य परिषद आयोजित मराठी नाट्य संमेलन यशस्वीपणें पार पडलें. (सर्व सामान्यपणें अशीं संमेलनें 'यशस्वीपणें' पार पडतात.) मुंबई-प्रमाणें नट, नाटककार, कलाकार यांचें वारंवार दर्शन घडत नसल्यानें मुंबईबाहेर असल्या संमेलनांना नेहमींच 'गर्दी' लाभते. नगरच्या संमेलनाला खूप गर्दी लाभली. माणसें उत्साहांत व उत्साही होतीं. रसिक स्वागताध्यक्ष (डॉ. श्रीराम रानडे) संमेलनाला लाभले होते. पु. भा. भाव्यांसारखा थोर साहित्यिक—नाटककार अध्यक्षपदीं होता. 'मत्स्यगंधे'सारखें प्रा. वसंतराव कानेटकरांसारख्या कसबी नाटककाराचें नवीन नाटक त्यांना पहायला मिळणार होतें. बरेचसे नट, नाटककार, नाट्यप्रेमी भेटणार होते. त्यामुळें नगरकरांनीं भरपूर उत्साह दाखविला. असल्या संमेलनांचें स्वरूप आतां ठरून गेलें आहे. परवां एकानें यावद्दल तळमळीची तक्रार केली. पण पुन्हां पुन्हां विचार येतो तो असा कीं, तें याहून वेगळें तरी काय ठेवूं शकणार? अखेर संमेलनाध्यक्ष, स्वागताध्यक्ष, चर्चिक यांनीं व्यक्त केलेल्या विचारांची 'नवता' हाच असल्या संमेलनांचा विशेष मानणें योग्य ! डॉक्टर श्रीराम रानडे यांचे विचार व त्यांचें व्यक्तित्व वेगळेपणें दिसलें कीं नाहीं? पु. भा. भावे यांनीं, पु. भा. भावे यांचाच ठसा भाषणावर उमटविला कीं नाहीं ? आणि तसा जर तो उमटविला असेल (आणि तो उमटविला) तर तीच त्या संमेलनाची कमाई ! तीच त्याची 'नवता' ! नाट्यविषयक चर्चेत अध्यक्षीय भाषणांत त्यांनीं एक महत्वाचा विचार मांडला तेवढाच फक्त इथें मांडतों. "रस उत्पन्न करणें, भावनिक आघात करणें, स्वप्नसृष्टींत नेणें हें नाटकाचें प्रधान कार्य आहे. जें नाटक रंगभूमीवरही रंगतें व वाचतांनाही हंसवतें रडवितें तें नाटक मोठें ! ज्या नाटकाचे खूप प्रयोग होतात व जें पैसा मिळवून देतें तें नाटक मोठें मानलें जातें. पण तें नेहमींच खरें असतें असें नाहीं. मोठ्या सत्त्वाचीं पात्रें ज्या नाटकांत असतात तें नाटक मोठें. मोठ्या सत्त्वाचीं माणसें राष्ट्राला मोठीं बनवितात. त्याचप्रमाणें मोठीं नाटकें नटांत महत्वाकांक्षा उत्पन्न करूं शकतात. त्याला मोठें बनवूं शकतात. मोठें नाटक समाजमनावर चांगलें संस्कार करूं शकतें. आज आपल्याकडे मोठीं नाटकें, मोठे नट व सुजाण प्रेक्षक यांची वाण आहे. मोठें लिहिण्याची करून दाखविण्याची आणि पाहण्याची ताकदच कमी झाली आहे. आणि हाच मोठ्या चिंतेचा विषय आहे. मोठें पाहण्याचीं, मोठें स्वप्न पाहण्याची, मोठें खरें असूं शकतें यावरची आमची श्रद्धाच मुळीं नाहींशी झाली आहे. याबाबत विचार करण्याची वेळ आली आहे." श्री. पु. भा. भावे यांचें संपूर्ण भाषण पुस्तिकारूपानें प्रसिद्ध होणें आवश्यक आहे. त्यांनी तें आधीं लिहिलें नसलें तरी तें 'टेपरेकॉर्ड' करण्यांत आलें असल्याचें कळतें. मराठी नाट्य परिषद ह्या सूचनेचा विचार करील अशी आशा आहे.

—सारस्वत.

(पृष्ठ ६३ वरून)

'तांब्यां'नीं हातीं घेतलेल्या या धंद्याचं 'सोनं' करून दाखविलं आहे.

या आपल्या कर्तबगार मित्राला आशीर्वाद देण्याचं आणि आपल्या सर्वांच्या सदिच्छा व्यक्त करण्याचं पुरोहिताचं काम शंतनुराव किर्लोस्कर यांनीं केलं ही अत्यंत उचित अशी गोष्ट घडली. कारण, शंतनुरावांचा प्रेमळ मार्गदर्शक हात धरूनच तांब्यांनीं ही मजल गांठली आहे. जो माणूस स्वतः मोठा होतो आणि मोठं होतां होतां इतरांना मोठं करतो, तो खरा मोठा होय. शंतनुराव असे आहेत. ज्या वृक्षाच्या छायेंत दुसरें झाड उगवत नाहीं, वाढत नाहीं असे कांहीं वृक्ष असतात. उलट कांहीं वृक्ष असे असतात कीं ते आपला जीवनरस अंशाअंशानं देऊन अनेक झाडं वाढवितात, महाराष्ट्राच्या सुदैवानं उद्योगाच्या क्षेत्रांत असा एक वटवृक्ष सध्या आहे. त्याचं नांव शंतनुराव किर्लोस्कर. त्यांनीं तांब्याच्यां या गृहप्रवेशाच्या समारंभाचा पुरोहितपणा केला, आणि तांब्यांचं सुयश चिंतिलं. तेव्हा आतां तांब्यांचा भावी अधिकच उज्ज्वल होणार याविषयीं मला शंका नाहीं."

तशी शंका आम्हांलाहि नाहीं. तांब्यांच्या विकसनशील कर्तृत्वाची वाटचाल ज्यांनीं जवळून पाहिली आहे त्यांपैकीं कुणालाहि तसल्या शंकेचा स्पर्शहि होणार नाहीं. हा नवा गृहप्रवेश संस्थेला सर्वच दृष्टींनीं सुफलदायी ठरून तिच्या शाखोपशाखांचा विस्तार होईल याची आम्हांस खात्री आहे.

—संपादक

प्रगतीपथावरील



## 'टॉम अॅण्ड बे' चें हार्दिक अभिनंदन !

नियतकालिकाशीं संबद्ध असलेल्या कोणत्याहि माणसास 'टॉम अॅण्ड बे' (अॅडव्हर्टायझिंग) प्रा. लि. या प्रख्यात जाहिरात संस्थेचा नव्यानें परिचय करून द्यायला नको. आपल्या प्रयोगशीलतेनें ही संस्था या धंद्यांत नेहमींच आघाडीवरचें स्थान पटकावून आहे. या संस्थेच्या जंगली महाराजरोड (पुणें) वरील नवीन कचेरीचा उद्घाटन समारंभ उद्योगपति श्री. शंतनुराव किर्लोस्कर यांच्या हस्तें दि. १४ मे '६४ रोजीं पार पडला. महाराष्ट्रांतला प्रमुख व्यापारी वर्ग या प्रसंगीं उपस्थित होता.

'दीपावली'ला या घटनेचा विशेष आनंद वाटण्याचें कारण या दोन संस्थांचा प्रारंभ योगायोगानें एकाच वेळीं झाला. पुढें दोघांचाहि व्यावहारिक संबंध जुळून आला तो आजतागायत आहे व पुढेंहि राहील एवढा घरोबा निर्माण झाला आहे याची 'दीपावली'च्या वाचकांना जाणीव आहेच. 'टॉम अॅण्ड बे'चे संचालक व आमचे परम मित्र श्री. गणेशराव तांबे यांनीं संस्थेसाठीं केलेले परिश्रम व अत्यंत विकट परिस्थितींत दाखविलेलें धैर्य आम्हांस पूर्णपणें माहीत असल्यानें त्यांच्या या आश्चर्यकारक प्रगतीमुळें आम्हांस त्यांच्याबद्दल सकौतुक अभिमान वाटतो व म्हणून या प्रसंगीं आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों व यापुढेंहि त्यांना अधिकाधिक यशप्राप्ति होवो अशी शुभेच्छा प्रगट करतों.

गृहप्रवेश समारंभाच्या वेळीं श्री. तांबे यांचें गुणवर्णन करणारीं अनेक भाषणें झालीं. श्री. ए. वी. नायर, जी. जी. फडके यांनीं जाहिरातधंद्याच्या एकेका पैलूचें महत्त्व स्पष्ट केलें. धंदा सुरू केल्यावर आपणांस कोणत्या अडचणी आल्या याबाबत श्री. तांबे यांनींहि आपले उद्बोधक अनुभव सांगितले. प्रा. अप्पासाहेब फडके यांचें भाषण अनेक दृष्टींनीं वैशिष्ट्यपूर्ण झालें म्हणून तें थोडक्यांत पुढें देत आहोंत. ते म्हणाले ––

"एकोणीस वर्षांपूर्वी या संस्थेच्या स्थापनेचा छोटासा समारंभ माझ्या हस्तें झाला. ज्या अपत्याची प्रसूति आपल्या हातून झाली त्याबद्दल त्या सुईणीला ममत्व आणि अभिमान वाटतो. माझें संस्थेशीं असलेलें नातें याच प्रकारचें आहे.

१९४५ सालीं या संस्थेचा मुहूर्त करण्याची गणपतराव तांब्यांनीं मला विनंती केली तेव्हां असल्या समारंभाच्या भानगडींत सहसा न पडण्याचा माझा स्वभाव असूनहि मी संमति दिली-याचं कारण एकच. 'टॉम अॅण्ड बे' या नांवांतील कल्पकता मला फार आवडली. त्या काळांत जें विलायती तें चांगलं अशी लोकांची भावना होती. म्हणून अनेक लोक धंदा चांगला चालावा यासाठीं आपल्या नांवाचा इंग्रजींत अपभ्रंश करीत (उदा. तळवलकर – टी. वॉकर, रामभाऊ चितळकर.– सी. रामचंद्र.) गणपतरावांनीहि आपल्या नांवाची फाळणी केली. मराठी 'तां' अक्षराचा ' Tom ' केला.' टॉम अॅण्ड बे' ही साहेब लोकांची कंपनी असं लोकांना वाटूं लागलं. कंपनीच्या भरभराटीचा मार्ग खुला झाला. गणपतरावांच्या डोकेबाजपणाची आणि जाहिरातकौशल्याची ही महत्त्वाची निशाणीच नव्हे काय ?

असा एक काळ होता, कीं जाहिरातबाजी आपल्या समाजाला फारशी मंजूर नव्हती. आपल्याच तोंडानं आपला मोठेपणा जो सांगतो त्याला 'पढतमूर्ख' म्हणावं, असं समर्थ रामदासांनीं म्हणून ठेवलं होतं. आजची परिस्थिति अगदीं उलट आहे. पण ज्या दिवसांत जाहिरातीविषयीं औदासिन्य होतं, त्या दिवसांत देखील या क्षेत्रांत कांहीं मराठी माणसांनीं जाहिरातबाजीचं शास्त्र आत्मसात केलं होतं. अशीं कांहीं माणसं म्हणजे आर्यन सिनेमाचे पन्नास वर्षांपूर्वीचे मॅनेजर बाप. सिनेमाची जाहिरात करण्यासाठीं ते नाना प्रकारच्या युक्त्या योजीत. चित्रपटाच्या धंद्यांतले दुसरे एक असे गृहस्थ श्री. वसंतराव मराठे. 'मौज' पत्राचे संस्थापक श्री. अनंतराव गद्रे. जाहिरातीच्या शास्त्राची आणि कलेची मराठी परंपरा अगदींच नाहीं असा कुणाचा समज होऊं नये म्हणून या आठवणी मुद्दाम सांगितल्या.

अर्थात् हें निर्विवादच आहे कीं, आज घटकेला जाहिरातीच्या धंद्याला फार मोठं आणि गुंतागुंतीचं स्वरूप आलेलं आहे. ज्याला हा धंदा यशस्वीपणें करावयाचा त्याचा समाजशास्त्र, अर्थशास्त्र, साहित्यशास्त्र यांच्याशीं परिचय हवा आणि मानसशास्त्राची तर उत्तमच माहिती हवी. समाजाचं मन त्याला ओळखतां आलं पाहिजे.

समाजाचं मन फार संस्कारशील आहे. जी गोष्ट वारंवार सांगितली जाते ती गोष्ट केवळ तिचा वारंवार उच्चार होतो म्हणूनच समाजाला खरी वाटूं लागते. तिच्याकडे तो आकर्षित होतो. 'मागणी तसा पुरवठा' हें तर खरंच. परंतु एखाद्या वस्तूची मागणी केव्हां वाढते ? तर त्या वस्तूची आपल्याला गरज आहे असं समाजांतल्या फार लोकांना वाटूं लागतं तेव्हां. वस्तू बनविणं हें कारखानदाराचं काम परंतु त्या वस्तूची गरज आहे अशी भावना समाजांत निर्माण करणं हें काम कुणाचं तर गणपतराव तांब्यांसारख्या चतुर जाहिरातदाराचं. आपल्या आयुष्याचा असा कोणताहि भाग नाहीं, कीं जिथें जाहिरातीचं काम नाहीं.

अशा या सर्वव्यापी धंद्यांत प्रगति करून घेणं सोपं नाहीं. या धंद्यांत संघटनेची गरज आहे. तारतम्य, गोड स्वभाव, दूरदृष्टि, धाडस या गुणांची गरज आहे. कल्पकतेची तर फार गरज आहे. हे सर्व गुण आमच्या तांब्यांच्या अंगीं आहेत म्हणूनच आडनांवाच्या या

(पृष्ठ ६२ वर)

(पान ९ वरून)

होय मोरू ! आपण प्रवासाला निघूं ! पण प्रवास करीत असतांना तूं मराभर मुंबईची कल्पना करीत राहूं नकोस. कारण मुंबई ही परस्पर–विरोधी गोष्टींनीं भरलेली आहे. त्यामुळें मुंबई म्हणजे काय, किंवा मुंबईकर कसा दिसतो याची खुद्द मुंबईकरांना सुद्धां कल्पना करतां येत नाहीं.

येथील सांताक्रुझ विमानतळावरून जेट विमानें सुटतात म्हणून मुंबईचें दळणवळण सुधारलें आहे असें तूं म्हणशील तर तुला रस्तोरस्ती हातगाड्या सुद्धां दिसतील. मलबारहिलवरच्या हवेल्या पाहून येथें हवेल्याच आहेत म्हणशील तर जागोजाग तुला कंबरभर उंचीच्या झोपडपट्ट्याहि दिसतील. हवेलींतला माणूस धनाढ्य असणारच अशी कल्पना करशील तर त्यानें क्षणापूर्वी दिवाळेंसुद्धां फुंकलेलें असेल ! आणि झोपडपट्टींतला माणूस पोटावर हात घेऊन बसला असेल अशी कल्पना करशील तर हातभट्टीच्या बाटल्या विकून तो शंभराच्या नोटासुद्धां मोजत बसलेला दिसेल.

मोरू ! कपडे नाहींत म्हणून अर्धनग्न राहून फिरणाऱ्या भिकारणी जशा तुला येथें दिसतील तशाच कपडे असूनहि अर्धनग्न फिरणाऱ्या सोसायटी गर्ल्स सुद्धां तुझ्या दृष्टीस पडतील. लोखंडाचे चणे खाऊन ब्रह्मपदीं नाचणारा माणूस सुद्धां चणेवाल्याकडून एक आण्याचे चणे घेऊन ते चघळत जातांना दिसेल. वर्षाचे तीनशें चौसष्ट दिवस परदेशी रेशमी वस्त्रें परिधान करणारी गुजराती शेठाणी गांधी जयंतीला कांग्रेस हाऊसमध्यें बसून चरखा फिरवतांना दिसेल. जन्मभर कवडी कवडी करून पैसे जमवणारा शेठिया एखाद्या संन्याशाच्या मागें लागून लाखों रुपये खर्च करतांना दिसेल !

असें हें चमत्कारिक जीवन आहे मुंबईतलें !

तूं मुंबई कितीहि पाहिलीस तरी 'मीं मुंबई पाहिली' असें तुला कधींच म्हणतां येणार नाहीं. कारण प्रत्येक क्षणीं आमची मुंबई बदलत असते. आमची आतां येथें हयात गेली. पण आम्हीं मुंबई पाहिली असें आमच्याच्यानें म्हणवत नाहीं. मोरू ! अख्ख्या शहराचें सोड. रोजच्या जाण्यायेण्याच्या रस्त्यावर एकदम एखादें नवीन दुकान सजलेलें दिसतें आणि त्या जागीं काल काय होतें तें आज आठवेनासें होतें.

रोजच्या रस्त्यावर अनेक लोकांचे चेहरे कधींतरी पाहिल्यासारखे वाटतात. पण ते कोणाचे तें चटकन् आठवत नाहीं. अनेक लोक रोजच्या रोज आपल्याकडे पाहून हंसतात. सलाम करतात. पण त्यांचीं नांवें ध्यानीं येत नाहींत. एखादा माणूस लोकल गाडींत शेजारीं उभा रहातो आणि त्याची चटकन् ओळख होऊन जाते. मग सदर माणूस आमच्याच चाळींत गेलीं दहा वर्षें रहातो आहे याचें ज्ञान होतें. घाईघाईनें मी हापिसांत जातों तेव्हां बाजारांतून घरीं परतणारा एक म्हातारा पेन्शनर गेलीं दहा वर्षें (म्हणजे पेन्शन घेतल्यापासून) "कुठें ? हापिसांत ?" असा मला नेमानें प्रश्न विचारतो. चौपाटीवर फिरायला गेलेलीं माणसें सुद्धां "कुठें ? फिरायला ?" असा एकमेकांना प्रश्न विचारत असतात.

अशी विक्षिप्त आहे ही मुंबई !

मोरू ! नुसते कान उघडे ठेवून तूं फिरलास तर सुखासाठीं मुंबईत आलेले लोक सुखी नाहींत असें तुला निश्चित वाटेल. कामगारांच्या संपामुळें व्यापार चालत नाहीं असें मांडवलदार म्हणतात. तर मांडवलदार पगारवाढ देत नाहींत म्हणून कामगार ओरडतात. पोरें अभ्यास करीत नाहींत म्हणून मास्तर ओरडतात. तर मास्तरांना कांहीं कळत नाहीं असा पोरें त्रागा करतात. पाणी मिळत नाहीं म्हणून लोक ओरडतात, तर पाणी फुकट खूप जातें असें म्युनिसिपालिटी म्हणते. खायला अन्न नाहीं असें म्हणणारे सुद्धां मेद झडवण्यासाठीं डाएटींगची भाषा करतात. मुलींच्या मागें लागण्यासाठीं मुलगे उत्सुक असतात, तरी मुलींचीं लग्नें होत नाहींत असें मुलींचे बाप ओरडतात. रहायला जागा नाहीं अशी ओरड चालू असतांनाच रोजच्या रोज स्वतंत्र बिऱ्हाडें थाटलीं जातात.

म्हणजेच मुंबईत काय चालूं आहे हें कोणालाच कधीं कळत नाहीं. म्हणून मोरू ! माझा एक सल्ला तूं ध्यानीं ठेव !

आपण मुंबईत फिरत असतांनाच तूं कान, डोळे उघडे ठेव. सारें कांहीं पहा. पण एक एक गोष्ट पाहून तूं तात्काळ मुंबईची ठोक कल्पना करून घेऊं नकोस. इकडून तिकडे चार दोन फेऱ्या मारून तुला मुंबईची ओळख होणार नाहीं. इंग्लंड-अमेरिकेंत चार सहा दिवस मुक्काम करून चार-सहाशें पानांचें प्रवास वर्णन लिहितां येतें, आणि त्या देशांची (स्वतःला झाली नाहीं तरी) इतरांना ओळख करून देतां येते. पण मुंबईची तुला तशी ओळख होणार नाहीं. तशी तूं ओळख करून घेऊंहि नकोस.

[क्रमशः]

---

(पान १० वरून)

संमेलनाला आलेले नाहींत ही जाणीव असतांनाहि त्यांनी त्यांची सोय वेगळ्या रीतीनें केली. संमेलनाच्या दिवशीं सकाळीं दहा वाजतां बाहेरगांवच्या प्रतिनिधींची संख्या दहा हजारांवर गेली. प्रत्यक्ष संमेलन चालू झालें तरी प्रतिनिधि येतच राहिले; पण या सर्वांची उत्तम अन्न, गार पाणी आणि व्यवस्थित निवाऱ्याची सोय मडगांवकरांनीं उत्साहानें केली. सबंध मडगांवांतील हिंदुसमाज ज्या तऱ्हेनें व ज्या कार्यकुशलतेनें या संमेलनांत राबला त्याला कुठेंहि तोड नसावी. बारा हजार मराठी माणसें सहा दिवसपर्यंत सुग्रास जेवण जेवलीं. लाडू, जिलब्या खाऊन ढरढरां ढेकर देत– "अशी उत्तम व्यवस्था होईल असें वाटलें नव्हतें बुवा" असे उद्गार काढून मडगांवकरांना धन्यवाद देतीं झालीं.

"सारा महाराष्ट्र जरी आज इथें आला असता तरी आम्हीं त्याची चोख व्यवस्था केली असती." असे उद्गार सर्वांचें स्वागत करतांना गोव्याचे मुख्य मंत्री नामदार दयानंदराव बांदोडकर यांनीं काढले तेव्हां टाळ्यांचा प्रचंड गजर झाला. संमेलनाचें व्यासपीठ त्यावेळीं मान्यवर साहित्यिकांनीं, भूतपूर्व अध्यक्षांनीं आणि संमेलनाध्यक्ष शिरवाडकर; स्वागताध्यक्ष काशीनाथ दामोदर नायक, उद्घाटक नामदार हरिभाऊ पाटसकर, गोमंतकाचे गव्हर्नर सचदेव प्रभृतींनीं फुलून गेलें होतें. एखाद्या पुराणकालीन मंडपासारखा सजविलेला तो अतिभव्य आणि

सुंदर मंडप पंधरा हजार श्रोतृवृंदांनीं फुलून गेला होता. मयुरासनावर अधिष्ठित झालेल्या वीणावादिनी सरस्वतीच्या भव्य चित्रानें आणि देशभक्त आणि साहित्यांतील युग-पुरुषांच्या अनेक चित्रांनीं सुशोभित केलेल्या त्या मंडपाच्या अतिभव्य प्रवेशद्वाराकडे नजर टाकणाऱ्याचा जीव मोहरून जाई. मंड-पाच्या बाहेर वीस हजार लोकांना बसतां येईल असें भव्य पटांगण होतें. त्या पटां-गणाच्या डाव्या-उजव्या बाजूला जेवण-खाण, आरामगृहें, व्यवस्थापकांच्या कचेऱ्या, पोस्ट, वैद्यकीय मदत आणि पुस्तकांचीं दुकानें होतीं. मंडपा बाहेर एका मजबूत दुर्गाचें आव-रण होतें. त्या दुर्गद्वारांना गोमंतकांतील फळ-फळावळींचीं तोरणें योजकतेनें बांधलीं होतीं. अशी भव्यता तेवढीच सुरूपता आजपर्यंतच्या चव्वेचाळीस संमेलनांत दिसली नाहीं असे उद्गार चव्वेचाळीसहि संमेलनाला वार-कऱ्यांसारखे हजर राहणाऱ्या कांहीं साहित्य भीष्मांनीं काढले. त्यांतील एक साहित्यभीष्म नागपूरचे श्री. शं. दा. पेंडसे यांनीं तर "इतकें भव्य आणि सुंदर संमेलन मीं यापूर्वी पाहिलें नाहीं !" असे स्पष्ट उद्गार काढले. मडगांवकर त्यामुळें धन्य धन्य झाले. त्यांच्या अविश्रांत श्रमाचें चीज झालें; सार्थक झालें !

स्वागताध्यक्ष काशीनाथ दामोदर नाय-कांनीं अथपासून इतिपर्यंत आवेशयुक्त भाषण केलें. उद्घाटक नामदार पाटसकर हे वास्तविक संयमानें मोजकेच बोलणारे; पण आजच्या भव्यतेंत त्यांनाहि स्फूर्ति आली. प्रत्येक गोष्टींत श्रोतृवृंद रस घेत होता. उत्थापन देत होता. अध्यक्षांना सूचना, अनुमोदनें, हारतुरे, पुस्तक प्रकाशनें होऊन अध्यक्षांचें भाषण सुरू झालें तेव्हां सात वाजून गेले होते. अध्यक्षांनीं लयदार भाषेंत आपलें भाषण सुरू केलें. त्यांच्या प्रत्येक वाक्याला श्रोत्यांनीं दाद द्यायला सुरुवात केली. "गोवा महा-राष्ट्रापासून वेगळा आहे या आग्रहाचा अर्थ एकच आहे, आणि तो म्हणजे गुलामगिरी गोव्याच्या प्रदेशांतून गेली, पण या लोकांच्या अंतःकरणांतून गेलेली नाहीं !" असे शब्द उच्चारतांच सभागृहाच्या डाव्या बाजूला ओळीनें बसलेल्या वीस पंचवीस कोंकणी-वादी श्रोत्यांतून निषेधाच्या आरोळ्या उठूं लागल्या. शहाणे होते त्यांनीं अलगदपणें उठून सभात्याग केला, कांहीं मिसरूडहि न फुटलेली पोरें मात्र गिल्ला करत राहिलीं. त्यांना मठग्रामस्थ तरुणांनीं बाहेर काढलें. अध्यक्षांचें भाषण अबाधितपणें चालू राहिलें.

कुसुमाग्रजांनीं केलेल्या भाषणांत त्यांच्या स्वभावांतली 'वैष्णव' वृत्ति प्रगट झालेली दिसते. त्यांनीं आपलीं मतें परखड शब्दांत मांडलीं. तीं मांडतांना कुणाचाही वैयक्तिक अधिक्षेप त्यांनीं केला नाहीं. कुठें आडपडदाही ठेवला नाहीं. कुसुमाग्रजांच्या अध्यक्षीय भाषणांतील दोन मुद्दे महत्त्वाचे वाटतात. एक श्लील–अश्लीलतेसंबंधींचा आणि दुसरा मायावी नवतेचा. "अश्लीलता विरोध" या विचाराच्या मुळाशीं नीति-अनीतीच्या कल्पना असतात. त्याचाच मूल-गामी विचार व्हायला हवा असें कुसुमाग्रजांना वाटतें. 'नीति–कल्पना' ह्या सतत उत्क्रान्त होत आलेल्या आहेत. आणि समाजाच्या बदलत्या रूपांच्या संदर्भात त्यांचा विचार होणें अगत्याचें आहे. साहित्यक्षेत्रांत नव-तेच्या नांवाखालीं जो दांभिक मायावाद येऊं पाहात आहे त्यावद्दलचाही इशारा मोलाचा वाटतो. लेखक आणि वाचक, कला आणि सामाजिकता, लिपी सुधारणा, आणि अनुभव आविर्भावाचा विचार हे त्यांनीं स्पर्शिलेले आणखी कांहीं विषय !

गोवा हिंदु असोसिएशनच्या कलाविभा-गानें सादर केलेल्या 'मत्स्यगंधे'च्या सुंदर प्रयो-गानें पहिल्या दिवशींच्या दृष्ट लागेल अशा अतिसुंदर कार्यक्रमाची सांगता झाली. विषय नियामक समितीच्या बैठकींत एकंदर अठ्ठा-वीस ठराव होते. त्यांत 'गोमंतकाचें महा-राष्ट्रांत तत्काल विलीनीकरण करावें' या महत्त्वाच्या ठरावावर रणें माजतील अशी जी कल्पना होती ती फोल ठरून तो ठराव एकमतानें पास झाला. 'संमेलनाचा मंडप जाळूं, पोळूं आणि संमेलनाचा विध्वंस करूं' अशी धमकीची भाषा विरोधकांनीं केली होती, पण संचालकांनीं त्यांना प्रेमानें पाचारून विश्वासांत घेतलेलें होतें; पण विरोधकांनीं फारसा शब्द पाळला नाहीं. त्यांनीं सभास्थानीं हुल्लड करायची ती केलीच. बीभत्स घोषणा करून तिसऱ्या दिवशीं खास शिवीगाळ करण्यासाठीं एक सभाहि घेतली.

रात्रीं कुमार गंधर्वांच्या गायनाचा कार्य-क्रम उत्कृष्ट झाला. 'मंगल दिन आज बना घर आयो हीं 'मालवती' या स्वकृत रागांतील चीज अतिशय रंगली. कुमार गंधर्व या बैठकींत एक भाव गीतहि गायले. साहि-त्यिक कार्यक्रम फारसे रंगतीचे झाले नाहींत. येतां जातां पहिल्या वर्गाचा खर्च संमेलना-कडून घेऊन आलेले साहित्यिकहि मनासारखें बोलले नाहींत. कुठें तरी दुसऱ्या 'रसांत' मन बुडालेल्यासारखे ते वावरले. असो !

तीन दिवसांचा साहित्य सोहळा संपला. गोव्याबाहेरच्या हजारों माणसांनीं तो डोळे भरून पाहिला. 'हें कसें आवरणार' या चिंतेनें ग्रासलेल्या मठग्रामस्थांच्या निष्ठेवर सरस्वती देवीनें कृपा केली, निसर्गानें कृपा केली आणि सर्व कार्यक्रम यथासांग व अविस्मरणीय अशा स्वरूपांत पार पडला. गोमंतकांतल्या धनि-कांनीं संमेलनाचा विस्तार लक्षांत घेऊन मुक्त हस्तानें हजारों रुपयांची मदत केली. संमेल-नाला एकंदर दोन लक्ष रुपये खर्च आल्याचें सरचिटणीस सुकेरकर यांनीं पत्रकारांना सांगि-तलें. श्री. सुकेरकर यांनीं या संमेलनासाठीं जिवापाड श्रम केले. कोषाध्यक्ष दामोदर नायक, स्वागताध्यक्ष काशीनाथ दामोदर नायक, श्री. सुब्राय नायक, भगवंत नायकां-पासून मडगांवांतील मराठीप्रेमी समस्त नायक घराणीं, श्री. आनंद आमोणकर, काशीनाथ परोब, मुक्तामाला सावईकर, रंगनाथ कामत प्रभृति कार्यकर्ते यांनीं हें संमेलन निढळाचा घाम गाळून यशस्वी केलें. पोस्ट आणि टेलि-ग्राफ, वैद्यकीय पथक या संस्थांनीं दाखविलेली आपुलकीहि अवश्य लक्षांत राहील.

बुद्धीनें दरिद्री असे कांहीं आपमतलबी लोकहि सहकुटुंब या संमेलनाच्या सवलतींचा फायदा घेऊन गोव्यांत गेले. ते प्यायले भरपूर, 'फॉरेन' वस्तूंसाठीं त्यांनीं जंग जंग पछाडलें, गोव्यांतल्या लोकांकडून आपलें हसें करून घेतलें आणि परत आले. मडगांवकरांनीं मात्रीं कुणां-तहि भेदाभेद मानला नाहीं. त्यांनीं संमेलना-साठीं आलों असें म्हणणाऱ्या सर्वत्रांची मोकळ्या मनानें व उदार अंतःकरणानें आपल्या अभिजात आतिथ्याला स्मरून सोय केली. मराठी भाषेवरील आपलें अभिजात प्रेम प्रगट केलें. आणि संमेलन 'न भूतो' असें यशस्वी करून दाखविलें. धन्य धन्य मडगांवकर ! आपल्या मठग्रामाचो त्यांनीं शान राखली.

●●●

दीपावली बुद्धिवळ क्र. ८ :



"दीपावली बुद्धिवळा"चे नियम व अटी मला मान्य आहेत.

स्पर्धकाचें नांव ____________________

____________________

पूर्ण पत्ता ____________________

____________________

**दीपावली बुद्धिवळ क्र. ८**

येथें कापा.

### आडवे शब्द

१ ऋषीचें निवासस्थान
३ एक हिंदु महिना
६ बहादुरी
८ रक्त
१० पक्कें वंद
११ वंदन
१२ व्यवस्थित
१५ विप
१६ घोड्यावरचा व्यायाम

### उभे शब्द

१ विहीर
२ उंच पोकळ स्तंभ
४ कमरपट्टा
५ रड्या माणूस
७ न सुटणारी मिठी
९ मरणें
१० एक पक्वान्न
१३ गीतांजलीचे लेखक
१४ समुदाय

**उत्तरें पोहोचण्याची शेवटची तारीख १५ जून १९६४**
**अधिकृत उत्तर–पुढील अंकांत**

### स्पर्धकांकरितां नियम व अटी

१. ही स्पर्धा निःशुल्क आहे.
२. ह्या स्पर्धेत कोणालाहि भाग घेता येईल.
३. स्पर्धेकरितां पाठविण्यांत येणारीं उत्तरें ह्याच पानावर छापलेल्या **चौकोनी कुपनांत** भरलेलीं असावीत. कुपनावर नांव व पत्ता लिहिणें आवश्यक आहे. **अन्यथा तीं विचारांत घेतलीं जाणार नाहींत.**
४. उत्तरें **'दीपावली बुद्धिवळ,'** संपादक, **'दीपावली,'** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई–४ या पत्त्यावर पाठवावींत.
५. ह्या स्पर्धेकरितां आलेल्या अचूक उत्तरांतून ती **लॉट पद्धतीनें काढून** ज्यांचें उत्तर आमच्या उत्तराशीं विनचूक असेल, अशा **पहिल्या पांच भाग्यवान विजेत्यांना** 'दीपावली'चे **वार्षिक वर्गणीदार** करण्यांत येईल व त्यांना वर्षभर 'दीपावली' भेट म्हणून पाठविण्यांत येईल.
६. एकावेळीं एकाच स्पर्धकास फक्त एकच चौकोन पाठविता येईल.
७. स्पर्धेबावत संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल. त्यावावत कसलाहि **पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.**
८. उत्तरें पोहोचण्याची अंतिम तारीख १५ जून १९६४ ही आहे. नंतर येणाऱ्या उत्तरांचा विचार होणार नाहीं. उत्तर पुढील अंकांत प्रसिद्ध केलें जाईल.

### "बुद्धिवळ" क्र. ७ चें उत्तर—

**आडवे शब्द—**
१ दादला, ३ कवन, ५ टरबूज, ८ पट्टराणी, १० कपिला, १२ मळभ, १५ पाणीदार, १७ मानपान, १९ सचोटी, २० खप्पड.

**उभे शब्द—**
१ दामचुंबक, २ लाट, ४ नराणी, ६ रहाणी, ७ जप, ९ राऊळ, ११ पिपाणी, १३ भरतखंड, १४ वचपा, १५ पाडस, १६ रमा, १८ नख.

**विजेत्यांचीं नांवें**
पृष्ठ ६० वर पहा.

*जाहिरात हा आमचा व्यवसाय*

# पण ही आमची जाहिरात नव्हे

१५ जून १९४५ रोजीं आम्ही आमच्या व्यवसायाला एका छोट्या जागेंत सुरुवात केली. आणि व्यवसायाच्या गतीबरोबर प्रगतीहि होत गेली या प्रगतिपथावरील आणखी एक टप्पा म्हणजेच जंगली महाराज रस्त्यावरील शानदार इमारतीमधील प्रशस्त जागेंतील आमचें स्थलांतर.

जाहिरात व्यवसायाला महाराष्ट्रांत आज जी प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे त्यांत आमचा प्रमुख वाटा आहे. याचा आम्हाला यथार्थ अभिमान वाटतो.

*मे. टॉम ॲंड बे ॲडव्हर्टायझिंग प्रा. लि.*

६५८, जंगली महाराज रस्ता, पुणें-४.



आमच्या नव्या ऑफिसचें उद्घाटन गुरुवार ता. १४ मे १९६४ रोजीं सायंकाळीं ५ वाजतां मुंबईचे शेरीफ श्री. ए. बी. नायर यांच्या अध्यक्षतेखालीं माननीय श्री. शंतनुराव किर्लोस्कर यांच्या शुभहस्तें झालें.

